# समरांगण

लेखक

म. भा. भोसले



फेब्रुवारी १९४१

किंमत दीड रुपया

प्रकाशकः—

दा. ना. मोघे, बी. ए.,
स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल,
कोल्हापूर.





( २ ) या कादंबरीचें लेखन ता. ८।८।४० ते ६।११।४० या अवधींत झालें.

( ३ ) मुखपृष्ठावरील चित्र चित्रकार श्री. शं. तु. माळी यांनीं तयार केलें.

मुद्रकः—

बा. ना. ठकार,
श्रीसिद्धेश्वर प्रेस, कोल्हापूर.

परमपूज्य

भाऊसाहेब खांडेकर,

(वि. स. खांडेकर)

यांच्या सेवेसी

सादर

स

म

र्प

ण

# बिनीचा आवाज



'समरांगण' या कादंबरीच्या लेखकाचा मला जो परिचय करून देण्यांत आला त्यामुळेंच मीं ही प्रस्तावना लिहिण्याचें पत्करलें. या कादंबरीचे लेखक श्री. भोंसले हे एक मराठी शाळेचे मराठी शिक्षक असून इंग्रजी–ब्रिटिश वाङ्मयाचा परिणाम त्यांच्यावर झालेला नसावा असेंच मला वाटलें.

या कादंबरीसाठीं त्यांनीं ज्या विषयाची योजना केली आहे तो विषय तात्विक दृष्टया जरी शहरी लोकांच्या परिचयाचा असला तरी प्रत्यक्ष अनुभवाच्या दृष्टीनें शहरापासून विलग असलेला पण शहराच्या हितसंबंधाच्या दृष्टीनें अभिन्नपरिणामी आहे. या विषयावर अधिकारी लेखकानें लिहिलेली कादंबरी अजून माझ्या पाहण्यांत आलेली नाहीं. खेड्यांतलें जीवन आणि खेड्यांतली सावकारी–जमीनदारी प्रत्यक्ष अनुभवून आणि तिच्यापासून होणारे खेड्यांतल्या जीवनावरचे परिणाम प्रत्यक्ष पाहूनच ही कादंबरी लिहिली गेली आहे असें दिसून येतें.

खेड्यांतील जीवन आणि खेडवळाचे क्लेश यांचा इतिहास, खरें पाहिलें तर, खेडवळानेंच लिहिला पाहिजे. द्रष्टा या नात्यानें लिहिणारा लेखक कितीही सहृदय असला तरी खेडवळाची ती पोटतिडीक त्याच्या ठिकाणीं नसते. जोपर्यंत असे खेडवळ साक्षर होऊन स्वतःचा इतिहास कथावाङ्मयाच्या द्वारें बखर करण्यास समर्थ झाले नाहींत तोंपर्यंत खेड्यांत वावरणारा, खेडवळांत मिसळणारा, आणि त्यांचीं सुखदुःखें त्यांच्या इतक्याच सहानुभूतीनें पहाणारा लेखक अशी बखर करण्यास आजच्या कालीं जास्त अधिकारी ठरतो आणि त्याच नात्यानें श्री. भोसले यांनीं लिहिलेली ही कादंबरी मला फार महत्त्वाची वाटते.

गरीब कुळांना छळणाऱ्या सावकाराच्या पोटीं गरिबांचा कैवार घेऊन झगडणारा त्याच सावकाराचा मुलगा आणि आपल्या छत्राखालीं गरिबांना घेऊन त्यानें केलेला झगडा या कादंबरींत चित्रित केला आहे.

आनुवंशिकतेवर माझा विश्वास नाहीं. सज्जनाचा मुलगा दुर्जन निपजतो; तसाच दुर्जनाचा मुलगा सज्जन असल्याचींही अनेक उदाहरणें आपल्यासमोर दिसतात. ' धांवता धोटा ' या कादबरींतील कान्हू कृष्णा अशाच स्वरूपाचा दाखवला गेला त्यावेळीं टीकाकारांनीं आक्षेप घेतले. पण दोन ध्रुव कादंबरींतील ' कृष्णा ' नांव घेऊन खेड्यांत जाणारी ' वत्सला ' मात्र टीकाकारांच्या दृष्टीनें आक्षेपार्ह ठरली नाहीं. सुलोचना आणि कृष्णा जिथें स्वाभाविक वाटतात तिथें हंसा आणि बिजलीच अवास्तव कां वाटाव्या ? बाप्पा स्वाभाविक वाटत असतां बाबा शिगवण अवास्तव कां वाटावा ? म्हणूनच मला या कादंबरीनें चटका लावला. ' धांवता धोटा ' आणि ' दोन ध्रुव ' यांतील अनुक्रमें ' कान्हू कृष्णा ' आणि ' कृष्णा ' वेषांतर करून आपलीं ध्येयें गाठण्याचा प्रयत्न करतात. पण समरांगणांतील भगवान आणि सुरेंद्र उजळ माथ्यानें समोरासमोर आपल्या बापाशीं झगडा करतात, हा विकास उत्साहजनक वाटतो. परिस्थितीच्या विकासाबरोबरच कादंबरींतील भूमिकांच्या स्वभावरचनेंतही हा विकास झालेला आहे. श्री. भोसले यांनीं आपल्या पात्रांचे स्वभाव–विकास दाखवतांना जास्त धैर्याचा अवलंब केला आहे.

ज्या पद्धतीनें ही कादंबरी लिहिली गेली आहे त्या पद्धतीच्या बाबतींत मतभेद होण्याचा संभव आहे. काव्यांत जसे चित्रबंध–मालाबंधादि प्रकार आपल्या कौशल्याच्या प्रस्थापनेसाठीं कवि उपयोजितो त्याचप्रमाणें प्रस्तुत कादंबरींत उपयोजिलेला प्रत्येक पात्राच्या भिन्न आत्मनिवेदनाचा प्रकार लेखनकौशल्याची प्रतिष्ठा दाखविण्यासाठीं अमलांत आणला आहे असें वाटतें. कादंबरीलेखनाचे दोनच मार्ग ग्राह्य ठरतात;

एक आत्मवृत्तात्मक — एकाच व्यक्तिच्या आत्मवृत्तात्मक आणि दुसरा वर्णनात्मक. आत्मवृत्तात्मक कादंबरींत कथानकाच्या व्यापक स्वरूपाला बंधन पडतें. एकाच व्यक्तीचा दृष्टीकोण आणि त्या दृष्टीकोणांत येऊं शकणारा कथानकांतील प्रांत याच्या पलिकडे लेखकाला जातां येत नाहीं. मराठी भाषेच्या अग्रस्थानीं असलेल्या कादंबरीकारांनींसुद्धां या प्रकाराचा क्वचितच उपयोग केला आहे. वर्णनात्मक कादंबरी लिहिणें कथानकाच्या परिपोषाच्या दृष्टीनें सुलभ असल्यामुळें बहुतांशीं त्याच पद्धतीचा अवलंब आजच्या बऱ्याच कादंबरीकारांनीं केलेला आहे. मला स्वतःला आत्मवृत्तात्मक पद्धती जास्त आवडते, परंतु प्रस्तुत कादंबरींत एकापेक्षां जास्त व्यक्तींचीं आत्मवृत्तें लिहून जें लेखनकौशल्य प्रगट झालें आहे, त्यामुळें कादंबरीला वर्णनात्मक कादंबरीचें स्वरूप आलें असून आत्मवृत्तात्मक कादंबरीच्या सहृदयतेची त्यांत उणीव भासूं लागली आहे. त्यापेक्षां ही कादंबरी वर्णनात्मक लिहिली असती तर जास्त आकर्षक झाली असती.

लेखकाची सुबोध भाषा पाहून मात्र मला अत्यंत समाधान वाटलें. खेडेगांवच्या वर्णनाच्या मधून मधून विखुरलेल्या काव्यपूर्ण छटासुद्धां तितक्याच सुबोध आहेत, हा या कादंबरीचा विशेष होय. चांगल्या प्रथितयश लेखकालाही ही कला साधलेली नाहीं आणि म्हणूनच इतक्या सुबोध भाषेंत एवढा बिकट विषय सहृदयतेनें मांडल्याबद्दल मी लेखकाचें अभिनंदन करतों.

११–२–१९४१
कोल्हापूर

भा. वि. वरेरकर.

# सलामी



गेलें वर्षभर या 'समरांगण' चें कथानक माझ्या मनांत घोळत होतें. पण मनांत घोळणं नी कागदावर खेळणं यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे, हेंच खरें! बाकी हेंच बरें आहे! नाहींतर मनांत आलेलें कथानक जर भराभर कागदावर उतरूं लागलें, तर अगोदरच मराठींत दरमहा शेकडों कथांची नी कादंबऱ्यांची भरमसाट निपज होते, म्हणून डोकें धरून हळहळत बसलेल्या मंडळीवर खचित झीट येऊन पडण्याचा प्रसंग येईल! अन् असा प्रसंग आला तर त्यांत कांहीं बिघडणार आहे असें नाहीं. त्यांना उठवण्याचा अगदीं सोपा उपाय आहे! मूर्च्छित पडलेल्याला कांदा हुंगायला देतातना; तसेंच यांना अत्र्यांची ब्रँडीची बाटली किंवा चिं. वि. जोश्यांच्या मळ्यांतलीं वायफळं हुंगायला दिलीं कीं बस्स! ते तेव्हांच शुद्धीवर येऊन पळत सुटतील!

पण ललित–लेखक जर आपल्या एकेका कथानकावर विचार करण्यांत वर्षांच्या वर्षें घालवूं लागला तर असा प्रसंग कधीं तरी येईल का?

तसेंच हा प्रसंग यावा अन् भारदस्त वाङ्मयासाठीं टाहो फोडणाऱ्या मंडळींना बेशुद्ध करण्याची संधि मिळावी, म्हणूनच जर ललितलेखक कथावाङ्मयाची निपज करूं लागला, तर त्याच्या लिखाणाच्या वावड्या होऊन त्या वाऱ्यावर फडकूं लागतील हें कांहीं निराळें सांगायला नको! म्हणून मी जरा भीत भीतच या कादंबरीचें पहिलें प्रकरण लिहिलें. त्यावर आणखी किती अवधि गेला

असता कुणास ठाऊक! पण तें प्रकरण वाचल्यापासून चि. राजाराम यादव यानें पुढें लिहिण्याबद्दल असा कांहीं तगादा माझ्या पाठीमागें लावला, कीं वेळप्रसंगीं लेखनसाहित्य समोर ठेवूनच तो मला लिहायला भाग पाडी. म्हणून हें लिखाण लवकर पूर्ण झालें. तसेंच औदुंबर सदानंद मंडळाचे सदस्य नि किर्लोस्करवाडीचे माझे मित्र मो. प्र. फडके, बी. ए., यांनीं हस्तलिखित वाचून उपयुक्त सूचना केल्या, मि. माळी यांनीं मुखपृष्ठावरचें सुंदर चित्र काढून दिलें व मामासाहेब वरेरकर यांनीं आपलीं निकडीचीं कामेंसुद्धां बाजूला सारून प्रास्ताविक चार शब्द लिहिले; त्याबद्दल मी ह्या सर्वांचा फार ऋणी आहे. श्री. मोघे यांनीं पुस्तकप्रकाशनाची सर्व जबाबदारी आपल्या शिरावर घेऊन आपलेपणानें साहाय्य केलें म्हणूनच मी आज सलामी द्यायला तयार झालों. नाहीं तर......

काय झालं असतं तें अन् वर सांगितलं हें सांगायची जरुरीच पडली नसती!

आतां एवढ्यावरच थांबलेलं बरं. कारण समरांगणांत शिरण्यासाठीं बेहोष झालेल्या वीरांना सलामीचा क्षण हा फुकट जाणारा वेळ असंच वाटत असतं! बाकी असं वाटलं तरी समरांगणांत उतरणाऱ्या प्रत्येक वीराला सलामी ही द्यावीच लागते; नाहीं का?

भिलवडी (जि. सातारा)
१५।२।४१.

**म. भा. भोसले.**

## बापूसाहेब

: १ :

कधीं कधीं दिवस मोठे विचित्र उगवतात. आजचेंच पहाना. रात्रीचे नऊ वाजलेत आतां. चांदणी रात्र असल्यामुळें चांदणं कसं सुंदर पडायला हवं होतं. पण पावसाच्या झिमझिमीमुळें बाहेर हवा अगदीं कुंद आहे. अन् आज सकाळपासून घडलेल्या प्रसंगांनीं माझं मन तर काय, अगदीं त्या हवेसारखंच झालंय ! भगवान मुंबईला गेला एवढंच मला ठाऊक होतं. कां आणि कशाला गेला याची चवकशी मी कशाला करूं ? वाटलं, गेला असेल सहज मजा म्हणून. सगळं शिक्षण त्याचं मुंबईला झालं. मुंबइची ओढ त्याला असायचीच कीं ! चार दिवस ताजमहालमधें राहील, सिनेमा बघील आणि येईल परत. अन् असल्या गोष्टींत चवकशी ती काय करायची ? असल्या गोष्टी त्यानें मनमुराद कराव्या असंच वाटतं मला. अहो, आमच्यासारख्या जमीनदारांच्या मुलांनीं पुण्यामुंबईला जायचं, तें काय तिथं नोकऱ्या बघायला कां तिथल्या गटारांतली घाण उप-

सायला ? मग वर्षाकाठीं हजारों रुपये कुळं घरांत आणून ओततात, त्याचं करायचं तरी काय ?

पण आमच्या भगवानला असला नाद कांहींच नाहीं.

परवां औदुंबरच्या यात्रेंत आम्ही दोघांनीं 'ब्रह्मचारी' नांवाचा सिनेमा पाहिला. किती मजा आहे त्यांत. मला तर वाटलं, आमच्या तरुणपणीं आम्हीं जे तमाशे बघत असूं त्याच्यापेक्षां कितीतरी चांगला आहे हा सिनेमा. पण भगवान त्याबद्दल कांहींच बोलला नाहीं. बाकी असल्या बाबतींत पोरानं बापाजवळ बोलायचं तरी काय म्हणा! पण त्याच्या दुसऱ्याच दिवशीं 'सावकारी पाश' पाहिला. त्यांत खंड न देणाऱ्या कुळाला जेव्हां बडवत नेतात तेव्हां मला वाटलं, बिलंदर कुळांना असंच वठणीवर आणायला पाहिजे. पण त्याचवेळीं भगवानचे डोळे डबडबलेले दिसले. पुढच्या प्रसंगांत जेव्हां दरोडेखोर त्या सावकाराला लुटतात तेव्हां धडकीच भरली मला! पण त्यावेळीं भगवान हंसत असल्याचा भास झाला मला. असा राग आला म्हणतां त्याचा. पण करतां काय, माझाच मुलगा ना तो!

अन् परवां तो मुंबईला कशाला गेला, त्याचें कारण आज कळलें. सकाळीं चहाचे वेळीं सहज हाताशीं आलं म्हणून मी वर्तमानपत्र चाळलं. तर त्यांत भगवानचा फोटो! केवढा आनंद झाला मला! निम्मा जन्म होत आला माझा. पण एकदांसुद्धां फोटो आला नाहीं वर्तमानपत्रांत. नाहीं म्हणायला, 'नंगानाच' या पुस्तकांत आहे माझा फोटो. पण त्याबद्दल दोनशें रुपये घेतले त्या लेखकानें. बाकी फोटो घालतो म्हणाला तो, म्हणूनच मी एवढे पैसे दिले. नाहीं तर कोण बसलाय् एवढे पैसे द्यायला ?

पण माझा भगवान! अजून पंचविशीसुद्धां ओलांडली नाहीं त्यानं; अन् एवढ्या अल्पवयांतच त्याचे फोटो येऊं लागले. त्याला डोक्यावर घेऊन नाचावंसं वाटलं मला. मी धांवतच तें वर्तमानपत्र घेऊन आंत गेलों, त्याच्या आईला दाखवायला! त्यांनाही केवढं समाधान वाटलं! भगवानचा हंसरा फोटो जणूं त्यांना विचारीत होता, तुम्ही मला लहानाचा मोठा केला, माझे नाहीं ते लाड केले, मला शिक्षण दिलें. मी तुमच्या श्रमाचं चीज केलं कीं नाहीं?

'केलं, केलं!' असंच त्यांनीं अन् मीही उत्तर दिलं असतं. पण त्यांनीं विचारलं, 'कशाबद्दल आलाय् फोटो?'

मी तरी कुठं पाहिलं होतं. म्हणून मी वाचूं लागलों, तों आंगावर बाँबगोळ्याचा वर्षाव व्हावा तसं झालं मला!

मुंबईला गिरणी कामगारांचा संप चालला होता. अन् तो लढवायला गेली होती ही स्वारी. तिथं हजारों कामगारांपुढं भाषण करून त्यांत त्यानं सांगितलं काय, तर म्हणे, 'सगळ्या जगांतली भांडवलशाही समाजरचना बदलल्याशिवाय जग सुखी व्हायचं नाहीं. एका वर्गानें रक्ताचं पाणी करून राबायचं अन् दुसऱ्यानं त्याच्या जिवावर ऐषआराम भोगायचा हेंच मुळीं चुकीचें आहे. आपल्या अज्ञानामुळें आजपर्यंत राबणारा वर्ग डोळे झाकून राबत आला. आपल्या श्रमाचा मोबदला—निदान आपल्या पोटाला तरी भरपूर मिळतंय कीं नाहीं, याची सुद्धां त्यानें चौकशी केली नाहीं. पण यापुढें त्याच्या श्रमाचा मोबदला त्याला मिळायलाच पाहिजे! अन् तसा मिळत नसेल तर तो आपल्या मनगटाच्या जोरावर मिळवील! बोला, भांडवलशाही नष्ट होवो, समतेचा विजय असो!'

मी स्वप्नांतच वाचतों कीं काय म्हणून पायाला चिमटा घेऊनसुद्धां

पाहिला. माझा मुलगा—जमीनदाराचा मुलगा कामगारांच्या सभेत असं बोलतो, यावर कुणाचा विश्वास तरी बसेल कां? पण तारुण्य म्हणजे काय वारं आहे नुसतं, अगदीं सोसाट्याचं! अन् कामगारांचा संप, शेतकऱ्यांची चळवळ हा सांसर्गिक रोग आहे. रोगाचं वाऱ्याशीं सहकार्य झाल्यावर मग त्याचा प्रसार व्हायला काय उशीर?

म्हणून मी भगवानच्या आईला म्हटलें, 'बघितलेत हे पोराचे गुण! मुळाच्यापोटीं केरसुणीचा जन्म होतो म्हणतात, तें कांहीं खोटं नाहीं!'

'आपला भगवान कांहीं तसा नाहीं!'

'मग कसा आहे?'

'हिरा आहे, हिरा!'

मी मनाशीं म्हटलं, आईला आपल्या मुलाच्याबाबतींत असंच वाटायचं!

अन् बापाला आपलीं मुलं काय, केरासारखीं वाटतात? भगवानचा जन्म झाला, आणि त्याचा सुंदर चेहरा मी जेव्हां प्रथमच पाहिला, तेव्हां प्रत्यक्ष कोहिनूर मिळाला असता तरी जेवढा आनंद झाला नसता तेवढा आनंद झाला मला! म्हणून मीही त्याला हिराच समजत होतों.

पण या हिऱ्याला ढेकणाची संगत लागली तर?

अन् भगवानच्या बाबतींत मी अधिकाधिक विचार करूं लागलों, कीं मला वाटतं, माझंच कांहींतरी चुकलंय्! त्याला डोक्यावर घेऊन नाचण्यांत फार मोठा आनंद वाटायचा मला. पण तोच आतां डोक्यावर नाचूं लागला तर—? त्याच्या लहानपणची एक गोष्ट आठवते. एका कुळानें लबाडी केली म्हणून मी त्याला चाबकानं

बडवूं लागलों. बागेंत खेळत असलेला भगवान दुड्दुड् धांवत आला अन् माझा हात धरूनच म्हणाला, ' बापू, कां मालता त्याला ? '

' पैसे उचलले यानें. '

' किती ? '

' पांच रुपये. '

' मग उचलीना. खूप आहेत कीं पैथे तुमच्याजवळ ! ' काय उत्तर द्यायचं त्यावेळीं त्या पांच वर्षांच्या पोराला ?

त्यानंतरचा एक प्रसंग. नवा कोट घालून तो शाळेंत गेला होता. त्याचा तो कोट बघून एक शेतकऱ्याचा मुलगा रडूं लागला म्हणे. अन् तेव्हां यानं तो कोट लागलीच काढून दिलान् त्याला. घरीं आल्यावर मी विचारलें,

' कोट कुठं आहे ? '

' दिला एका गरिबाच्या मुलाला. '

' अन् तुला आतां ? '

' तुम्ही कराल कीं दुसरा ! '

त्यावेळीं त्याच्या असल्या गोष्टीचं आम्हा नवराबायकोला मोठं कौतुक वाटायचं. परवां तर त्यानं आपल्या शेतकऱ्यासाठीं एक रात्रीची शाळा काढून सगळ्यांना लिहावाचायला शिकविलें. त्यालासुद्धां मी विरोध केला नाहीं. पण उद्यां त्यानं आपल्या जमिनी शेतकऱ्यांना द्या म्हणून सांगितलें तर—अन् या विचारासरशीं कांटाच उभा राहिला माझ्या आंगावर !

   

त्यानंतर तो दुपारचा प्रसंग. कुठला तरी एक भिकारी दरवाजांतून सरळ आंत आला अन् मधल्या चौकांत उभा राहून अन्नासाठीं

ओरडूं लागला. मी वरच्या सोप्यांत येरझाऱ्या घालीत होतों. त्याचा तो फाटक्या चिंध्यानीं झाकलेला नी पावसांत भिजल्यामुळें कुडकुडणारा अर्धनग्न देह बघून 'त्याची कींव येण्याऐवजीं' असला अवतार आपल्या वाड्यांत शिरल्याबद्दल मला त्याचा रागच आला. भिकारी तो भिकारी! त्यानं आपल्या पायरीनंच वागायला नको कां? शिवाय त्याची ओरड सारखी चालूच होती, 'माई, दादा हो. देव तुम्हाला बरकत देईल. या एका वाड्याचे चार वाडे होतील! पसारा वाढेल.' अन् तें ऐकून मला त्याचा भारीच राग आला.

भीक मागण्याची देखील त्याला अक्कल नव्हती. एकाद्या झोपडीसमोर भीक मागतांना त्यानं तो आशीर्वाद उच्चारला असता, तर घासभरच कां चांगलं पोटभर जेवायला मिळालं असतं. पण ज्याच्या मालकीचे पांच वाडे आहेत. अन् ज्याला देवानं बरकत इतकी दिली आहे, कीं ती पुन्हां मागण्याची जरूरच नाहीं. त्याला त्याच्या आशीर्वादाचें काय वाटणार? उलट त्याला तशा आशीर्वादानें उपमर्द झाल्यासारखेंच वाटेल! अर्थात् मला तसेंच वाटलें. तेव्हां मी रागानें त्याला म्हटलें, 'चालता हो बाहेर. इथं कांहीं मिळायचं नाहीं.'

पण तो 'भिकारी' होता. चालता हो, म्हटल्याबरोबर जर तो जाऊं लागला तर दिवसभर फिरून अन्नाचा एक घास तरी मिळेल का त्याला? तो जागचा तर हलला नाहींच. पण जरा पुढं सरूनच म्हणाला, 'देवानं दिलंय हें सगळं!'

'पण तुझ्यासारख्या भिकाऱ्यांना देण्यासाठीं नाहीं!'

'सगळीं माणसं देवाचीं लेकरं असतात.'

'असतील. मी जाणत नाहीं तें. तूं बाहेर हो अगोदर!'

'पण देवाला आवडणार नाहीं हं.'

मला त्याच्याशीं वाद घालायला नको होता. म्हणून मी तिरस्कारानेंच म्हणालों, 'न आवडना. काय करील देव माझं?'

अन् त्याला काय वाटलं कुणास ठाऊक! डोळे फिरवून तो एकदम बोलला, 'सत्यानाश!'

अंगाचा डोंब झाला माझ्या, गांवांतले सगळे शेतकरी माझ्याशीं एकादा शब्द बोलतांना थरथर कापतात नुसते. अन् एका भिकाऱ्यानें माझ्यासमोर माझा 'सत्यानाश' होईल म्हणावं! मला भान राहिलं नाहीं. मी समोर जाऊन काड्कन् त्याच्या मुस्कटांत मारली. किती दिवसाचा उपाशी होता बिचारा कुणास ठाऊक! तिरीमिरी येऊन तो धाडकन् फरशीवर आपटला. तरी त्याचें मला कांहींच वाटलें नाहीं. पुन्हां लाथ हाणून मी त्याला उठवला. अन् बाहेर पावसांत ढकलला. तडफडत तो बाहेर गेला. पण तोंडानं सारखा बडबडत होता, 'तुझा सत्यानाश होईल. देव तुझं चांगलं करणार नाहीं.'

कुणी तें पाहिलं नाहीं म्हणून बरं झालं. नाहीं तर कुणी बोललं नसतं तरी वेड्यांतच गणना व्हायची माझी. वर मी दिवाणखान्यांत गेलों. आरामशीर एका कोचावर आंग टाकलें. पण न कळत उगीचच माझ्या मनाला हुरहूर वाटूं लागली. कावळ्याच्या शापानं ढापी थोडीच मोडते! असं मी मनाचं समाधान करूं लागलों. पण त्या भिकाऱ्याची ती दीन मुद्रा कांहीं केल्या माझ्या डोळ्यापुढून हलेना. अन् त्याचे ते शब्द 'तुझा सत्यानाश होईल. देव तुझं चांगलं करणार नाहीं!' मला पुनः पुन्हां ऐकूं आल्यासारखे वाटूं लागले! पूर्वीच्या कथा सांगतात, कीं देव भिकाऱ्याच्या वेषानं

येऊन आपली परीक्षा पाहतो म्हणून. अन् आज तसंच झालं असलं तर ? माझ्या मनाची सारखी तळमळ होऊं लागली. कधींच नव्हे तें आज त्या भिकाऱ्याला आपण विन्मुख पाठवायला नको होतं. अन् त्याला मारण्याचा आतताईपणा तर आपण मुळींच करायला नको होता, असं मला सारखं वाटूं लागलं. पण त्याला इलाज होता कां आतां !

❦ ❦ ❦ ❦

अन् संध्याकाळीं तर कळसच झाला. दिवे लागणीचा सुमार होता. पावसाची झिमझीम सारखी चालूच होती. अन् नदीला पाणीही चढत असल्याचं गड्यानं येऊन सांगितलं. आमचीं सगळीं गुरं नदीकडच्या घरांत होतीं. पाणी जर जास्त चढत असेल तर गुरं तिथून काढायला हवीं; असं मी त्याला सांगितलं. तेव्हां तो म्हणाला, ' त्येंच सांगायला आलोवतो. पाणी लई चढतंय ! '

' मग सांगायचं काय त्यांत ? सोडा लगेच गुरं, अन् न्या गांवदरीच्या वाड्यांत ! '

गडी चांचपडत म्हणाला, ' पण ततं तरी कुठाय जागा ? '

' म्हणजे ? तो वाडा रिकामाच आहे ना ? '

' रिकामा हुता. पण...रावसाबांनीं...! '

' काय ? रावसाबांनीं काय ? एकादी बाई तर आणून ठेविली नाहीं ना ? ' मी हसत विचारलें.

' बाई काय इतकी मोठी असतीया व्हय, सगळा वाडा भरायजोगी ? मग गुरास्नी जागा मिळाली असती. पण त्यांनीं शेरींतल्या सगळ्या शेतकऱ्यास्नी दिलाय वाडा तो. ते परवादिसीच येऊन राहिलेत ! '

' अन् मला न विचारतां ? कुठला रावसाब अन् कुठले शेतकरी ? वाड्याचा मालक मी आहे ! '

माझ्या अंगाचा तिळपापड झाला नुसता !

मी गड्याला बरोबर घेतला. अन् त्या वाड्याकडे जायला निघालों. मी वाड्यांत गेलों. सगळा वाडा माणसांनीं भरला होता. सगळीकडे कंदील चिमण्यांचा उजेड होता. अन् त्या उजेडांत बायका स्वयंपाक करीत होत्या. कुणी बाहेरून आल्यामुळें राड झालेले पाय मोरीजवळ धुण्यांत गुंतले होते. कुणी आपल्या आंगावरलीं ओलीं पोतीं नी घोंगडीं झटकून काठीवर टाकीत होते. बायकांनीं आपलीं लुगडीं गॅलरीच्या कठड्यावर टाकलीं होतीं तीं खालपर्यंत लोंबत होतीं. अन् बारीक थेंब येत होते तरी मधल्या चौकांतल्या फरशीवर खेळतांना मुलांना केवढा आनंद वाटत होता. तें दृश्य पाहून क्षणभर मी मुग्ध झालों. वाटलं, वाडा कितीही मोठा असला तरी त्याचं खरं सौंदर्य त्या मोठेपणांत नाहीं. त्यांत रात्रीं दिवा जळण्यांतच खरें सौंदर्य आहे ! या वाड्याकडे मी रात्रीचा अनेकवेळां आलों होतो. पण त्यावेळीं रुक्ष नी भयाण वाटणारा हा वाडा आज एकाद्या राजप्रासादासारखा शोभत होता. ही शोभा या माणसामुळेंच आली होती ! अशी माझ्या सगळ्या वाड्यांना शोभा आणणारीं माणसं माझ्या कुटुंबांत कां असू नयेत ? पण नाहींच. जगांत विषमता आहे, हेंच खरें ! नाहींतर ज्याच्या मालकीचे चारपांच वाडे आहेत, त्याच्या कुटुंबांत तीनच माणसं आणि ज्याला राहायला झोपडीसुद्धां नाहीं; त्याच्या कुटुंबांत दहावीस माणसांचा भरणा असं कां व्हावं ?

आमचा पैसा कुजला तरी हरकत नाहीं. आमचे वाडे मोकळे

राहिले न् भयाण दिसले तरी बेहेत्तर आहे! पण या लोकांना आम्हीं त्यांत राहूं देणार नाहीं. म्हणून मी आंत शिरलों. मी आल्याचें कळतांच कितीतरी शेतकरी माझ्या भोंवती जमले. मी त्यांना खडसावून सांगितलें, ‘ कुणाला विचारून तुम्ही इथं राहायला आलांत? तुम्हाला आपलं बिऱ्हाड घेऊन आत्तांच्या आतां बाहेर पडावं लागेल. इथं आमचीं गुरं येणार आहेत. ’

त्यांच्यापैकीं एकजण हळूच म्हणाला, ‘ परवाच्या पावसानं आमच्या झोपड्यांतून सगळं पाणीच झालंय! आम्हाला राहायला जागा नाहीं. ’

‘ चांगले वाडे बांधा कीं. ’

‘ कशानं बांधा? रक्ताचं पाणी करून आम्हाला तुमची भर करावी लागते! ’

‘ माझ्यावर उपकार करीत नाहीं तुम्हीं. ’

‘ अन् इथं राहाण्यांतही तुमचा आमच्यावर उपकार होत नाहीं. हा वाडा आमच्याच कष्टाचा अन् आम्ही कमावलेल्या पैशाचा आहे. कायम नाहीं, तरी चार दिवस राहाण्यापुरता हक्क आहे आमचा!’ त्यांच्यापैकीं एक आडदांड तरुण बोलला.

‘ हक्क! हा हक्क इथं चालावयाचा नाहीं. अन चालवूं लागाल तर मग स्वर्गांत मात्र खात्रीनं हक्काची जागा मिळेल! हें लक्षांत ठेवा अन् मुकाट्यानं चालूं लागा! ’ मी संतापानें लाल होऊन सांगितलें. त्यावर कुणी कांहीं बोललें नाहीं. कित्येकजण आपलं बिऱ्हाड आवरायला लागले. पण कांहींनीं जणूं निश्चयच केला होता बाहेर न पडण्याचा! माझा संताप अनावर झाला होता. पण काय करावें तें कळत नव्हतें.

राऊ चव्हाणाला मी सामान इलवायला सांगितलें. तो कांहींच बोलला नाहीं. पण त्याची ती पोरटी पुढं येऊन म्हणाली,

‘ आम्हाला रावसाबांनीं सांगितलंय राहायला. ’

‘ कुठला रावसाहेब ? वाड्याचा मालक मी आहे ! ’

‘ अन् रावसाहेबसुद्धां मालकच आहेत ! ’

काड्‌कन त्या पोरीच्या मुस्कटांत द्यावी, असं मला वाटलं. पण तसं केलं नाहीं. नऊ वाजायच्या आंत सगळा वाडा रिकामा करून ठेवायला पाहिजे असें सगळ्यांना बजाऊन परत जायला निघालों. दरवाजांत आलों तर कित्येकांची सामान बाहेर काढण्याची गडबड चालली होती. तशा पावसांत ते कुठं जाणार होते ? पण कुठं का जाईनात. आपला वाडा मोकळा झाला म्हणजे झालं. अशा विचारानं मी घरीं आलों. पण मला जेवण गोड लागलें नाहीं. कुळांची मगरुरीची भाषा जन्मांत आज मी पहिल्यानेंच ऐकत होतों. अन् याला कारण भगवानच नव्हता का ? म्हणून मला राहून राहून वाटूं लागलं, भगवान एकदां मुंबईहून येतो केव्हां, अन् मी त्याची कानउघाडणी करतों केव्हां ?

## सुभद्रा

: २ :

‘ सुभद्रा, ’

या हाकेनं मी मागं वळून पाहिलं. बाबा दारांतून आंत येत म्हणत होते; ‘ पोरी, झोपूं नयेस का आतां ? ’

तोंच डॉक्टरांच्या खोलींतल्या घड्याळयांत तीनचे ठोके पडले. पुढें चार, पांच, सहा वाजून उजाडलें तरी मला झोप येणं शक्य नव्हतं. सभोंवती आगीचा डोंब उसळल्यावर माणसाला झोप यावी तरी कशी ? मी बाबांना विचारलं, ‘ गणूचं कसं आहे ? ’

‘ गणू...! ’

एवढाच शब्द बाबांच्या तोंडून निघाला. अन् त्यांच्या डोळयांत पाणी तरळल्याचा मला भास झाला.

‘ पोरी, गणूचं आटोपलं. सुटला बिचारा. बापूसाहेबांच्या धुंदीचा पहिला बळी ठरला तो. उद्यां आणि किती बळी पडतायत् कुणास ठाऊक ! ’

मला हुंदका आवरला नाहीं. ' गणू ' म्हणून रडतच मी बाबांच्या गळयांत पडलें. मी म्हटलें, ' आणखी बळी ? शक्य नाहीं ! बाबा मेंढरं बळी पडतात. माणसासारखीं माणसं बळी पडूं लागलीं तर तें आपण उघड्या डोळ्यांनीं बघायचं ? उद्यांच मी रावसाहेबांना तार करतें. अन् बोलावून घेतें. '

' रावसाहेब तरी काय, बापूसाहेबांचाच मुलगा ना ? '

अन् त्यांनीं तसं म्हणतांच क्षणभर सगळी खोली फिरत असल्यासारखें झालें मला. पण त्या मुसळधार पावसांत हातांत छत्री धरून निम्मी अर्धी भिजतच आमच्या झोंपड्याकडे धावत येणारी रावसाहेबांची मूर्ती मला दिसूं लागली. अन् वाटलं, रावसाहेब तसे नाहींत. ' खाण तशी माती ' म्हणतात, पण त्या मातींतच सोनं सांपडतं कधीं कधीं ! ते त्या सोन्यासारखे आहेत.

नाहींतर बापूसाहेब !

पावसावरच शेतकऱ्यांचं जीवन असलं तरी जगानं उघड्यावर टाकल्यानंतर शेतकऱ्यांना पाऊस अधिकच उघडं करून सोडतो. सोसाट्याच्या वाऱ्यानं छपरावरचा पाला उडविला. अन् मुसळधार पावसानं त्यांत पाण्याचे लोट सोडले. बिचाऱ्या शेतकऱ्यांनीं मग राहायचं तरी कुठं ? आपण होऊन रावसाहेब तिथं धावत आले. आणि ती स्थिति पाहून त्यांनीं आपला गांवदरीचा रिकामा वाडा उघडून दिला. तीन दिवस ते सुखानं झोपले तिथं. पण गरिबांनीं वाड्यांत राहाणं हें अन्यायाचेंच नाहीं कां ? जन्मभर उघड्यावर पडलेल्या शेतकऱ्यांना वाड्याची हवा मानवावी तरी कशी ? रात्रींचं बापूसाहेबांची संक्रांत त्यांच्याकडे वळली न् बिचाऱ्या गणूला जन्मांतनं उठवला तिनं !

बाहेर काळोख मी म्हणत होतो. पाऊस पण थांबलेला नव्हता. अन् तशा स्थितींत बापूसाहेबांनीं सगळ्या शेतकऱ्यांना वाड्याबाहेर व्हायला सांगितलें. सगळ्यांनीं जायची तयारी केली. तेव्हां हंबीर अन् मी म्हणालें, 'काय होईल तें होऊं द्या. रावसाहेब येईपर्यंत इथनं हलायचं नाहीं !' पण तसा धीर कुणालाच झाला नाहीं. सगळ्यांनीं आपलं सामान अन् बायकापोरं बाहेर काढलीं.

पण जायचं कुठं ?

थोड्याच वेळांत बापूंचीं गुरं त्या चिरेबंदी वाड्यांत निवाऱ्याला बसतील. जगांतलीं कुत्रीं मांजरंसुद्धां निवाऱ्याला बसलीं असतील. पण आम्हीं माणसं असून आम्हांला निवारा नव्हता ! काळोखांत नी पावसांत कुडकुडत बाहेर पडण्यावांचून आम्हाला गत्यंतर नव्हतं.

इतक्यांत गणू मोठ्यानं किंचाळला. कुणाजवळ कंदीलही नव्हता. काय झालं तें पाहाण्याकरितां एकानं काडी ओढली. गणूच्या टाचेंतून भळभळ रक्त वाहात होतें. तें पाहिल्याबरोबर हंबीर मोठ्यानं ओरडला, 'गणूला साप चावला नाहीं. बापूसाहेब चावले ! मरेमरेतों आम्ही कष्ट केले, तरी आम्हाला निवाऱ्याची जागा नाहीं, कीं उजेड नाहीं. जगांतल्या काळोखांत साप चावल्या-मुळं आम्हांला असंच मरण यायचं ! मग हे वाडे—ज्यांचा आम्हाला कांहींच उपयोग नाहीं ते — असून काय जाळायचे ?'

असें बोलून तो धांवतच त्या वाड्यांत निघाला. पण त्याच्या-कडे लक्ष द्यायला कुणालाच सवड नव्हती. गणूला देवळांत नेणं अन् डॉ. सदानंदानां बोलावणं यांतच सगळीं गुंतलीं होतीं. मला वाटलं, संतापाच्या भरांत हंबीर काय वाटेल तें करील ! म्हणून मी पळत जाऊन त्याला अडविला, 'कुठं निघालास ?'

'आग लावायला !'

'पण तिचे चटके आपणांलाच बसतील !'

'बसेनात. पण आश्रमांत जाईपर्यंत उजेड तरी मिळेल !'

उजेड ! माझे आंग शहारल्यासारखें झालें. आगी लावल्यावांचून आम्हाला उजेड मिळणंच शक्य नाहीं कां ? आणि आगी लावून आम्ही उजेड मिळवूं लागलों तर जगांत शेवटीं जाळायला कांहीं शिल्लक तरी राहील का ? मी त्याचा हात धरला. तेव्हां तो म्हणाला,

'वेडी तर नाहींस ? अग, माझी पानाची पिशवी विसरलोंय् मी आंत. अन् तींत औषधाची मुळी आहे !'

'मग मी देतें आणून. कुठाय् सांग ?'

'तुला सांपडायची नाहीं. अंधार बघितलास कां आंतला ? तूं तिकडे गणूकडे जा. डॉक्टर आले कां बघ. मी इतक्यांत येतों पिशवी घेऊन !'

मी त्याला नाईलाजानें सोडला आणि गणूजवळ येऊन बसलें. त्याला झाडपाल्याचीं औषधं चारलीं, लिंबाचा रस पाजला, पण उलटी कांहीं झाली नाहीं. उलट विष जास्त जास्तच चढत होतं. शेवटीं तर तो बेशुद्ध झाला अन् त्याच्या तोंडांतून फेस गळूं लागला ! मान ढळूं लागली. त्याची जगण्याची आशा दुरावत चालली, तसा बायकांनीं आक्रोश सुरूं केला. त्यांची समजूत कशी करावी, मला कांहींच कळेना. थोड्याच वेळांत डॉक्टर आले. त्यांना सर्व हकिकत कळल्यावर त्यांनीं उपचार सुरू केले. आणि मला सर्व बायकांमुलांना घेऊन आश्रमांत जायला सांगितलें. पण नुकताच गणूला साप चावल्यामुळें अंधारांतून जायची छातीच होईना.

म्हणून मी आश्रमांतून कंदील आणण्यासाठीं एक गडी पाठविला.

पण तो यायच्या आंतच वाड्यांतून आगीचे लोट निघूं लागले. धडकीच भरली मला! चोहोंकडून एकच धांवपळ झाली. हंबीर बाहेर आलेला मी पाहिला नव्हता. हातपाय गळल्यासारखे झाले माझे. मी ' हंबीर, हंबीर ' म्हणून मोठ्यानं ओरडलें! इतक्यांत तो दरवाजांतून बाहेर येतांना मला दिसला. मी धांवत जाऊन त्याचा हात पकडला अन् म्हटलें, ' हंबीर, काय झालं हें? '

' अन्यायाचं शासन. सुभद्रा, मी...! '

पण मी त्याला पुढं बोलूं दिलं नाहीं.

सगळा काळोख नाहींसा झाला होता. कितीतरी दूरचा आश्रम आतां स्पष्ट दिसूं लागला होता. तो प्रकाश हंबीरनं मिळविला होता. पण त्याकरितां–त्या क्षणभराच्या प्रकाशाकरितां–आतां कदाचित् जिवाचं मोलसुद्धां द्यावं लागेल! अन् त्या विचारा-सरशीं माझ्या आंगावर कांटा आला.

आतां आश्रमांतल्या कंदिलाची वाट बघायचं कांहींच कारण नव्हतं. उजेड कसा चक्क पडला होता. पण त्या उजेडानंच आगीची बातमी हां हां म्हणतां गांवांत पसरली. देवळांत गणू-जवळ एकदोन माणसं बसवून बाकीच्या माणसांसह डॉक्टर आले. आणि गांवांतून माणसं घेऊन बापूही धांवले. ती आग बघून ते पिसाळल्यासारखेच झाले. ते सारखे बडबडूं लागले, ' तुम्हाला बाहेर काढलं म्हणून तुम्ही लोकांनींच ही आग लावली. विझवा आग. नाहींतर घुसा आगींत. रहा कीं वाड्यांत! ' एकाद्‌दुसरा माणूस असता तर त्यांनीं खरंच त्याला आगींत ढकलायला कमी केलं नसतं. आग विझविण्याचा प्रयत्न करणारांना ते सांगूं लागले,

'वाडा जळला तरी फिकीर नाहीं. पण या सगळ्या लोकांची राखरांगोळी केल्यावाचून माझं समाधान व्हायचं नाहीं.'

तसा इंब्रीर एकदम उसळला अन् त्यांच्यासमोर उभा राहून म्हणाला, 'बापू, मी लावली आग!'

'तूं लावलीस? मग भोग कीं त्याचं प्रायश्चित्त!'

म्हणून बापू त्याला वाड्यांत--त्या आगींत ढकलूं लागले—. माझ्या काळजाचा थरकांप झाला नुसता. मी पुढं गेलें. अन् बापूंचा हात धरला. पण त्यांनीं मला बाजूला ढकलून दिलें. तेव्हां डॉक्टरनीं वेळींच पुढं होऊन बापूंना आवरलं. आणि दुसऱ्या लोकांनीं इंब्रीरलाही दूर नेला. पण बापू सारखे ओरडत होतेच, 'इंब्रीर, इंब्रीरनं आग लावली ही. त्याला पकडा. आगींत ढकला!'

आग विझविण्याचा चोहोंकडून प्रयत्न झाला. पण एकदां भडकलेली आग विझत नाहीं, हें बापूंना कळायचं होतं कीं काय कुणास ठाऊक! आग जरासुद्धां कमी झाली नाहीं.

त्या आगीच्या प्रकाशांतच बायकांमुलांसह आम्हीं आश्रमांत आलों. पुरुषांनीं मग सामानही आणून टाकलं. आश्रमांतील एक पऱ्याची इमारत मोकळीच होती. तींत बायकामुलांची सोय लावली. अन् भगवानना पत्र लिहिण्यासाठीं म्हणून मी या खोलींत येऊन बसलें. पण डोक्यांत इतका कल्लोळ माजला होता, कीं त्यांतलं लिहावं काय तेंच सुचेना. आग विझली का म्हणून मी पुनः पुन्हां खिडकींतून पाहत होतें; देवळांत गणूचं काय झालं असेल म्हणून माझं मन तळमळत होतं, तर उद्यां इंब्रीरसाठीं काय करावं, म्हणून सारखी काळजी लागली होती. अन् अशा स्थितींत तीन तास केव्हां गेले तें माझं मलाच कळलं नाहीं.

आणि बाबांनीं येऊन जेव्हां गणू वारल्याचं सांगितलं, तेव्हां मला केवढ्यानं तरी हुंदका आला. पण माझ्या डोळ्यांतून पाणी आलं नाहीं. यावं तरी कसं? थोड्याशा आंचेनं पाणी ऊतूं येतं अन् सांडतं. पण आग जास्त झाली तर तेंच पाणी आटून जातं.

मी बाबांना म्हटलें, 'बाबा, गणू तर गेला. आतां इंबीरचं कसं हो होईल?'

'कांहीं होणार नाहीं. आज ना उद्यां परमेश्वराला दया येईलच!'

'पण माणसंच माणसांना खाऊ लागल्यावर परमेश्वरानं तरी काय करायचं?'

बाबा बाहेर गेले. चार वाजतां गणूला अग्नि देऊन माणसं परत आलीं. डॉक्टरसुद्धां नदीवर गेले होते. त्यांनीं सांगितलं, 'गणूला वाळलं जळणसुद्धां पुरतं मिळालं नाहीं!'

पण जन्मभर कष्टानं वाळलेल्या देहाला जाळायला जळण तरी कितीसं लागणार म्हणा! सगळीं माणसं झोंपलीं. डॉक्टरही झोपतील असं वाटलं. पण चांगलं उजाडेपर्यंत ते कांहीं तरी लिहित बसले होते.

मला मात्र झोंपही आली नाहीं. अन् पत्रही लिहायचं झालं नाहीं. उजाडेपर्यंतचा वेळ मी नुसता तळमळत काढला!

त्यानंतर माझ्यापुढं पहिला प्रश्न उभा राहिला तो हा, कीं आतां इंबीरला कसा वांचवायचा? आगलाव्या सापडला असतांना त्याला मोकळा सोडायला बापूसाहेब कधीं तरी तयार होतील कां?

याबाबतींत डॉक्टर काय म्हणतात तें बघावं, म्हणून मी त्यांच्या खोलींत गेलें. ते बाहेर गेले होते. म्हणून मी थोडा वेळ तिथंच थांबलें. समोरच्याच भिंतीवर महात्माजींचा फोटो, दोन्हीं बाजूस

जवाहरलाल, सुभाषबाबू यांच्या फोटोंसह बसविला होता. अन् त्याखालीं डॉक्टरांचा फोटो होता. आपला फोटो खालीं लावण्यांत डॉक्टरांची विनयशीलताच दिसत होती. पण मला वाटलं, वरच्या मालिकेंत बसविण्याइतकी त्यांची योग्यता मोठी आहे. गांधी, जवाहरलाल, सुभाषबाबू देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीं अतुल त्याग करतात–प्रत्यही आपलं रक्त आटवितात आणि हजारों लोकांपुढें भाषणें करून देशांतल्या लोकांच्या अंत:करणांत देशाभिमानाची ज्योत जागती ठेवतात. त्यांचं हें कार्य डोळे दिपवणारं असलं, तरी समाजाच्या दृष्टीनें डॉक्टरांचें कार्यही तितकेंच महत्त्वाचें नाहीं का ? ते सामान्य जनतेच्या हाताला धरतात, तिच्या सुखदु:खाची विचारपूस करतात आणि दु:खाचे पहाड ओलांडून तिला सुखाच्या शिखराकडे नेण्यासाठीं आजन्म झटतात !

गेलीं कित्येक वर्षें डॉक्टर हेंच करीत आले !

पैसाच मिळवायचा म्हटलें असतें तर पुण्यामुंबईला राहून त्यांना लाखो रुपये मिळवितां आले असते. पण पैसा मिळवून बंगले बांधणें, मोटारी उडविणें किंवा युरोप अमेरिकेच्या सफरी करणें हें त्यांना कधींच पसंत नव्हतें. मी त्यांच्या खुर्चीच्या वर पाहिलें. सोनेरी अक्षरांत तिथं पाटी झळकत होती, ‘स्वत: जगण्यापेक्षां दुसऱ्याला जगविण्यांतच माणुसकी आहे!’ अन् या आपल्या आवडत्या तत्त्वाप्रमाणें वागून त्यांनीं साधी माणुसकीच नव्हे तर दहावीस कोसांच्या टापूतील लोकांकडून चांगलें देवपण मिळविलें आहे. पैशानं माणूस राक्षस होतो, पण सेवेनं त्याला देवत्व येतं!

पुण्यामुंबईसारखीं शहरं सोडून त्यांनीं ह्या खेड्याचा आश्रय केला, तो या सेवाव्रतासाठींच ! अन् तें व्रत त्यांनीं आपल्या धंद्या-

पुरतंच ठेवलं नाहीं. औषधावांचून तडफडणाऱ्या हजारों रोग्यांना तर वाचविलंच पण भगवानासारख्या श्रीमंत तरुणाला समाज-सत्तावादी बनविलं, हंबीरसारखें तेजस्वीवृत्तीचे अनेक तरुण तयार केले. आमच्या शेतकरी समाजांत मुलांनादेखील शिक्षण मिळा-यची मारामार तेथें माझ्यासारख्या मुलींना त्यांनीं शिक्षण दिलें. एवढेंच नव्हे तर आमच्या या बोरगांवांतील प्रत्येक माणसाला अडी-अडचणीच्यावेळीं त्यांनीं पाहिजे ती मदत केलेली आहे. गेल्या वर्षीचीच गोष्ट. नदीला महापूर आलेला. आमच्या गांवचीं दोन माणसं पोहायला गेलीं, तीं घाबरून नदीच्यापलीकडं पाण्यांतच एका झाडाला धरून बसलीं आणि मदतीसाठीं ओरडूं लागलीं. अंब्यानें नाव काढली. पण तो एकटा नाव नेणार कशी? पाणी तर सारखें चढायला लागलेलें! नावेचीं वल्हीं मारायला कुणीच तयार होईना. डॉक्टर स्वतः वल्हं मारायला बसले अन् त्यांनीं अंब्याला नाव सोडायला सांगितलें. थोड्याच वेळांत त्या दोन माणसांना घेऊन ते परत आले.

इथं आल्याबरोबर त्यांनीं एक आश्रम काढला होता म्हणे. तो अनाथाश्रम किंवा महिलाश्रम नव्हे तर या दोहोंना विसंगत असा ब्रह्मचर्याश्रम. पण ब्रह्मचर्याश्रम काढणं जितकं सोपं होतं तितकंच तो टिकवणं अवघड होतं; याचा अनुभव त्यांना लवकरच आला. सगळे ब्रह्मचारी पळून गेले. अन् ब्रह्मचारी असे ते एकटेच राहिले. तरी अजून या ठिकाणाला सगळे लोक आश्रमच म्हणतात!

डॉक्टरांच्या या अनेकविध जनसेवेची मला आठवण झाली, कीं कित्येकवेळां वाटतं, एवढा त्याग यांनीं कां केला? कुणी म्हणतात, त्यांचा प्रेमभंग झाला होता. कुणी म्हणतात, त्यांची

पत्नी अन् एक मुलगाही आहे म्हणून. पण त्यावर आमचा विश्वास बसत नाहीं. कारण अतुल त्यागाच्या कारणाची चवकशी करणं म्हणजे सूर्यानं प्रकाश कां पाडला, याचें कारण पाहात बसण्यासारखेंच मूर्खपणाचें नाहीं कां ?

डॉक्टर आंत आले. म्हणून मी उभी राहिलें. मला 'बैस' म्हणत ते खुर्चीवर बसले. आतां हंबीरबद्दल कसं बोलायला सुरवात करावी तें मला कळेना. कारण अशा गंभीर प्रसंगींसुद्धां ते कांहीं तरी थट्टा केल्यावांचून राहायचे नाहींत. पण मला बोलावें लागलें नाहीं. तेच म्हणाले,

'तूं कशाकरितां आलीस तें मी ओळखलं.'

'ज्योतिषीच आहांत कीं नाहीं !'

'ज्योतिषीच कशाला पाहिजे ? कांहीं कांहीं माणसांचे चेहरे फार बोलके असतात !'

'मग काय सांगतोय माझा चेहरा ?'

'हंबीरला वांचवा.'

'इश्श ! त्याकरितां आलेंच नव्हतें मी !'

'मग तर नक्कीच. 'इश्श' हा शब्दच सांगतोय् !'

मला लाजल्यासारखें झालें. मी म्हटलें, कांहींतरीच बोलतां तुम्ही?'

'कशाकरितां आलीस तर ?'

'रावसाहेबांना बोलवा म्हणून सांगायला. मी तार करतेंच आज. पण तुम्हीही...... !'

किती झट्कन खोटं बोलायला तयार झालें मी. पण माणसाचं मनच असं विचित्र असतं, कीं कित्येक प्रसंगीं असं खोटं बोलण्यांतच एकप्रकारचा आनंद वाटतो !

त्यांनीं ड्रॉवरमधलं एक पाकीट काढून तें पोस्टांत टाकायला मजजवळ दिलं. त्यावर रावसाहेबांचा मुंबईचा पत्ता होता. पहाटे हें पत्र लिहिण्यांतच स्वारी गुंतली होती तर ! खूप जाडसं होतं पत्र. कालची सगळी हकिकत त्यांनीं आपल्या शिष्याला कळवलेली असावी. या पत्रावरून आपले पाणीदार डोळे फिरवितांना रावसाहेबांना अचंबा वांटल्यावाचून राहायचा नाहीं. गणूचा मृत्यू, हंबीरचा आततताईपणा, आणि बापूसाहेबांचें वर्तन या गोष्टी ते पुनः पुन्हां वाचतील. अन् आपल्या उंच कपाळावर येणारे केसाचे झुपके उजव्या हातानं स्वारी तितकेच वेळां मागं सारील !

चहा घेऊन झाल्यावर डॉक्टर गांवांत जायला निघाले. मी जें सांगायला त्यांच्याकडे आलें होतें, तें सांगायचं राहिलंच होतं. म्हणून मी चुळबुळत होतें. ते बाहेर पडतांना मी विचारलें,

‘ कुठं निघाला ? ’

‘ बापूसाहेबाकडे. ’

‘ कां ? ’

‘ हंबीरबद्दल विचारायला. नाहींतर ते फिर्याद देऊन बसायचे. ’

‘ बरं. ’ म्हणून मी त्यांना निरोप दिला अन् हंबीरच्या भेटीसाठीं मागच्या कौलारींत गेलें.

मला वाटलं, तो अगदीं घाबरून गेला असेल. पण मरणालासुद्धां जो भीत नाहीं, त्याला तुरुंगाचें काय वाटणार ? तो हंसत आपल्या आईला सांगत होता,‘ आई, होईल थोडे दिवसांची शिक्षा. सगळ्यांना त्रास होण्यापेक्षां एकाला शिक्षा झालेली वाईट नाहीं ! ’

मी त्याच्या आईला सांगितलें, ‘ डॉक्टर आतां गेलेत बापूकडे. कदाचित् ते क्षमाही करतील ! ’

त्यावर म्हातारी खवळून म्हणाली, 'मांग आहे तो. त्याला थोडीदेखील दया यायची नाहीं !'

मी हंबीरला म्हटलं, " रात्रीं तूं 'मी आग लावली' असं म्हणालास तेंच चुकलं !"

'कांहीं चुकलं नाहीं. गुन्हा कबूल केला तरच शिक्षा होते, नाहींतर होत नाहीं, असं थोडंच आहे. गुन्ह्याशिवाय गरिबांना शिक्षा करण्याचा जगाला हक्कच आहे !'

'शिक्षा झाली तर तुरुंगांत तुझे हाल होतील !'

'हाल होतील कां सुख होईल ? अग, जग हाच एक मोठा तुरुंग आहे ! गरीब हे या तुरुंगांतले कैदी. अन् श्रीमंत हे पोलीस. त्यांनीं या कैद्यांना वाटेल तसं छळावं ! आतां पुन्हां शिक्षा व्हायची म्हणजे काय, या मोठ्या तुरुंगांतून छोट्या तुरुंगांत जायचं !'

केवढं सत्य सांगितलं त्यानं. 'जग हाच एक मोठा तुरुंग आहे.' अन् जे गरिबींत जन्म घेण्याचा गुन्हा करतात, ते सगळे या तुरुगांतले कैदी ! जगाला कैदखान्याचं रूप कुणी आणलं ? कोट्यावधि कैद्यांनीं कीं मूठभर पोलीसांनीं ? जोपर्यंत या कोट्यावधि कैद्यांना याची जाणीव नाहीं तोपर्यंतच हे कैदखाने चालतील ! पण अशी जाणीव या कैद्यांना कोण देणार ? माझ्या डोळ्यापुढं हंबीर होताच, त्याच्या जोडीला रावसाहेबांची मूर्ति दिसूं लागली !

वाटेल तें झालं तरी 'मी आग लावली.' असं न सांगण्याबद्दल हंबीरला माझ्या गळ्याची शपथ घालून मी पोस्टांत गेलें.

आणि शेवटीं कुणाचंच न ऐकतां बापूसाहेबांनीं पोलीस बोलावले. हंबीरला अटक झाली !

## यशोदा

: ३ :

कल्पना नसलेल्या गोष्टी घडल्या कीं माणसाचें चित्त बावरून जातें! कालपासून माझं अगदीं तसं झालंय्. ज्या गोष्टी घडल्या त्यांचा कशाशींच मेळ बसवितां येईना. मोकळ्या असलेल्या वाड्यांत चार दिवस राहिलेल्या शेतकऱ्यांना हे काळ्याकुट्ट अंधारांत नी पावसांत बाहेर काढतील हें मला स्वप्नांतसुद्धां खरं वाटलं नसतं! अन् यांनीं बाहेर हाकललं तरी वाड्याला आग लावण्याइतके शेतकरी खवळतील, यावर तर माझा विश्वासच बसला नसता. पण या भयंकर गोष्टी रात्रीं घडल्या!

त्यांची आठवण झाली, कीं अजून कसे आंगावर शहारे येतात, अन् भीतीनं कांपरं भरल्यासारखं होतंय्!

त्यांचं तर कशाकडेच लक्ष नाहीं. रात्रीं ताटावर बसून एक-दोन घांस खातात न खातात तोंच आगीची बातमी आली. तसे धांवत गेले ते तिकडे. आज सकाळीं अगदीं लवकर मी त्यांच्या-

कडे चहा पाठविला. पण चहाचं सरबत झालं तरी त्याकडे त्यांचं लक्ष गेलं नाहीं. आणि दुपारीं बारा वाजले तरी त्यांना जेवायची आठवण होईना.

त्यांना बोलावण्यासाठीं म्हणून मी माजघरांतल्या जिन्यांतून वर गेलें. पण दिवाणखान्यांत जाणं मला शक्य नव्हतं. शेतकऱ्यांपैकीं बरेचजण तिथं बसलेले मला खिडकींतून दिसले. अन् तिथलं बोलणंसुद्धां मला ऐकूं येऊं लागलं. शेतकऱ्यांना हे सांगत होते, ' आग लावल्याचं रात्रीं इब्रीरनं कबूल केलेलेंच आहे. पण तेवढ्यानं भागत नाहीं. त्याला पुरावा हवा. म्हणून, तुम्हीं सर्वांनीं त्यानं आग लावली अशी साक्ष दिली पाहिजे. एवढेंच नव्हे तर तो आग लावीत असतां आपण त्याला पाहिलं, असंहि तुम्ही सांगितलं पाहिजे!'

शेतकऱ्यांपैकीं कुणीच कांहीं बोललं नसावं. कारण हेच पुन्हां रागानं म्हणाले, ' बोला, अशी साक्ष तुम्हीं देणार कीं नाहीं ? '

कुणीतरी एकजण अडखळत बोलला, ' धनी, तुम्ही म्हणतांसा तें खरं! पन् बिनधडक खोटं कसं बोलावं ? '

' मी सांगतों ना कसं बोलावं तें! '

' पण खोटं बोलनं हें पाप हाय! देव त्येच्याबद्दल आमास्नी शिक्षा करील! '

' ती मेल्यावर होईल! पण माझ्या उलट गेलां तर उद्यांपासूनच तुम्हाला शिक्षा भोगावी लागेल. माझ्या जमिनी पिकवितां म्हणून तुम्हाला घांसभर खायला तरी मिळतें. उद्यां मी जमिनी दिल्या नाहींत तर, अन्नावांचून तुम्हांला तडफडत मरावं लागेल! जा, तुम्ही आतां. माझ्याविरुद्ध जाऊन इब्रीरला वांचवायचा, कीं माझं ऐकायचं तें तुमचं तुम्ही ठरवा ! '

मला वाटलं, आतां सगळे शेतकरी रागानं उठून जाणार. पण त्यांच्या सहनशीलतेची कमाल झाली. त्यांना राग आला असला तरी सुप्त ज्वालामुखीप्रमाणें तो चेहऱ्यावर दिसला नाहीं. एवढी सहनशीलता ते कुठं शिकले? पण गरिबींत ती शिकवावी लागत नाहीं, हेंच खरें!

कुणी कांहींच बोलेना. तेव्हां सुभद्रेचा बाप राऊ म्हणाला, ' बापू, तुम्हांस्नी सोडून आमाला भागल का? पन् जसा तुमचा भगवान, तसाच हंबीरबी! त्येला दया दाखवा! '

दया!

दया हें एक झाड आहे. त्याची निपज प्रत्येक हृदयांत असते. जरूर तेवढें पाणी मिळाल्यास त्याची जोमांत वाढ होते, फळाफुलांचा त्याला बहर येतो. अन् कुणी अपेक्षा न करतांहि तें दुसऱ्याची भूक नाहींशी करतं, मधुर वासानं त्याला गुंगवतं आणि गार सावलीनं त्याला स्वर्गसुख देतं. पण तें झाड करपलं तर? त्याच्याकडे याचना करूनहि कांहीं उपयोग नाहीं! झाडं कां करपतात? पाणी न मिळाल्यामुळें हें उघड आहे. पण फार पाण्यामुळंही झाडं कुजून जातात!

राऊला यांनीं उत्तर दिलं, ' दया माणसावर दाखवायची असते. सापावर नाहीं! '

राऊच्या अगोदर मलाच त्यांचा राग आला!

क्षणांत त्यांनीं हंबीरला साप केला. पण तो खरंच साप असता तर? साप डाव धरून दंश करतो म्हणतात. हंबीरनं तसंच केलं असतं. अन् त्याच्या विषानं-पण विषारी दांत पाडल्यावर विष तरी कुठलं म्हणा! असे विचार माझ्या मनांत येणं म्हणजे-पण न आले तरी खरं बुडणार आहे थोडंच!

इंब्रीरच्या एकुलत्या एका बहिणीलां जन्मांतून उठवली यांनीं. बायकांची अब्रू म्हणजे कांचेच्या भांड्यासारखी असते. जरा तडकलें, कीं संपला कारभार! दारूच्या नशेंत यांनीं तिची अब्रू नासली. त्याचा व्हायचा तोच परिणाम झाला. लग्नाच्या अगोदरच बिचारी गरोदर राहिली. गरिबांची अगोदर लग्नं व्हायची पंचाईत. अन् तशा स्थितींत तिला कोण पत्करणार! सगळ्या भाऊबंदांनीं तिला टोंचून टोंचून खाल्लें. पण शेवटपर्यंत ती कांहीं बोलली नाहीं. अखेर तिला काय वाटलं कुणास ठाऊक! तिनं यांचं नांव सांगितलं. आणि त्याचदिवशीं आमच्याच मळयांतल्या विहिरींत जीव दिला. म्हणेल तितका पैसा ओतून हे कायद्यांतून निर्दोषी सुटले. पण जग यांना कोणत्या तोंडानं निर्दोषी म्हणणार? कायद्याच्या डोळ्यावर झांपड असली तरी जगाचे डोळे सतत उघडेच असतात! तेव्हां-पासून इंब्रीर सारखा मनांत जळफळतोय अन् त्याची म्हातारी यांच्या नांवानें खडे फोडतेय!

इंबीरनं आग लावली असो अगर नसो. त्याला तुरुंगांत डांबण्याचा यांनीं जो एवढा अट्टाहास चालवला आहे, तो केवळ त्यानं आग लावली म्हणूनच नव्हे! तर नाग केव्हां दंश करील याचा नेम नाहीं, या भीतीमुळेंच!

ते शेतकरी साक्ष द्यायला कबूल होत नाहींत असं दिसलं, तेव्हां त्या सहासातजणांना त्यांनीं अखेरचं म्हणून सांगितलं, कीं 'तुम्हाला प्रत्येकाला पन्नास पन्नास रुपये देईन, अशी साक्ष दिलीत तर!' एकादा रुपयासुद्धां कधीं ज्यांच्या हातांत खेळायचा नाहीं, त्यांनीं पन्नास रुपयाचा मोह कसा आवरावा?

इंब्रीरच्या बाबतींत धडधडीत अन्याय होत होता. पण तो

पहात बसण्यावांचून मला काय करतां येणार होतं ? माझ्या निष्क्रियतेची मलाच लाज वाटली. अन् मी खालीं आलें. पण खरंच मला कांहींच करतां येणार नाहीं कां ? गेली पंचवीस वर्षं मी काय केलं ? असले अनेक अन्याय पाहत अन् स्वतः सहन करीत आलें !

माझं लग्न लागलं तेव्हां लोकांच्या दृष्टीनें मी एका बड्या जमीनदाराची पत्नी झालें. पण या वाड्यांत मी पहिलं पाऊल टाकलं तेव्हांच मला कळून आलं, कीं मी एका चुनेगची बंदिखान्यांत अडकलें !

कॉलेजांत जीं मी दोन वर्षें काढलीं, त्या दोन वर्षांच्या मोकळ्या वातावरणांत माझ्या मनाचा किती विकास झाला होता. मी अनेक खेळ खेळलें, गरिबांची दुःखं बघून नी वाचून त्यावर भाषणं केलीं, समाजसेवेचें ध्येय ठरविलें. आणि नाईलाजच झाला—बाबा जेव्हां आपला हेका अजिबातच सोडीनात तेव्हां एका मोठ्या आशेनंच मी या स्थळाला संमति दिली होती. ती आशा म्हणजे समाजसेवेचीं अनेकविध कार्यें मला करतां येतील ! पण त्या सर्वांना इथं सुरवातीलाच पायबंद पडला. सगळ्या जगाला घर मानणारी मी; पण या वाड्याचा मागील अर्धाभाग, हेंच माझं जग ठरलं ! या जगांतून मला बाहेर पडतां येत नव्हतं. मग समाजसेवेचं नांव कशाला ? अन् या जगांतही कांहीं करतां येत नव्हतं—करूं देत नव्हते ! सकाळीं बिछाना झाडण्यापासून रात्रीं बिछाना टाकण्यापर्यंत सगळीं कामं करायला नोकर होते. मग मी करायचं तरी काय ?

आर्यस्त्रियांना पती हाच देव असतो. त्या देवाच्या सेवेंत माझा वेळ गेला असता तर हें असलं बंदिवान जिणंही मला सुखाचं वाटलं असतं. पण स्त्रियांनीं पतीला देव म्हटलं, कीं हे देव

आपल्या पत्नीला देवी समजतात. आणि दोघांनाही देवपणा आल्यावर कुणी कुणाची सेवा करायची ? मग देव आपल्या सेविका बाहेर बघतात. अन् बिचाऱ्या देवी घरांतच तळमळत पडतात !

बड्या जमीनदारांना दोन चार बायका—लग्नाच्या नसल्या तरी निदान ठेवलेल्या— असल्याच पाहिजेत, असा शिरस्ताच आहे जणूं ! त्यांनीं एकपत्नीव्रतानं राहाणं म्हणजे कुळाला बट्टा लावण्यासारखें आहे. मग हे तरी त्याला अपवाद कसे ? लग्नाच्या अगोदर पासूनच संबंध असलेली एक छोकरी यांनीं खालच्या वाड्यांत आणून ठेवली.

रात्रीच्या रात्री मी यांच्यासाठीं तळमळत काढाव्या. अन् यांनीं खालच्या वाड्यांत रात्रभर मजा मारावी; हें नित्याचंच होऊन बसलं! राजापुरला कांहीं वर्षांनीं गंगा येते. तसं यांनीं कधींतरी या वाड्यांत यावं अन् धुसपुसत, जुलमानं इथं एकादी रात्र काढावी !

कित्येक रात्री मी दिवाणखान्याच्या पुढच्या गच्चींत उभं राहून त्या वाड्याकडे पाहात काढल्या आहेत. त्यावेळीं मला वाटायचं माझ्या हृदयाला लागलेल्या आगीप्रमाणें त्या वाड्याला आग कधीं लागेल ! पण लगेच मनांत यायचं त्याला आग लागली अन् त्याची राख झाली, तरी आपल्या हृदयाची आग थोडीच विझणार आहे ! त्याच्यापेक्षां सुंदर असा दुसरा वाडा ते ताबडतोब बांधतील.

बाराहि महिने नदीला भरपूर पाणी असायचं. पावसाळ्यांत तर केवढाले पूर यायचे. त्या पुरांत उडी घ्यायची मला कितीदां तरी इच्छा झाली. जीव द्यायसाठीं नाहीं ! पोहायसाठीं. पुण्याला असतांना मी एक पोहण्याचें बक्षीस मिळविलें होतें. पण ते पूर मला कधीं बघायला मिळाले नाहींत. पाणी वर आलें म्हणजे त्याचा खळ-

खळाट ऐकूं येई. अन् मग मी समजें, नदीला पूर आलाय म्हणून !

कित्येकवेळां मळ्यांत जाऊन फिरावं, असं मला वाटे. पण जमीनदाराच्या बायकांनीं घराबाहेर पडायचं नसतं ! मळ्यांत फुललेल्या फुलांच्या किंवा भेंडीगोवारीच्या ताटव्याचें, तुरे टाकणाऱ्या मक्याचें किंवा विहीरीला नवीन लागलेल्या उमाळ्याचें वर्णन गड्यानं किंवा मोलकरणीनं करावं, अन् तें मी या वाड्यांत बसून ऐकावं !

अशा स्थितींत काय करावं तें मला कळत नसे. दिवसभर यांची कुळांशीं चाललेली हुजत कांहीं न बोलतां ऐकावी, किंवा पुस्तकं वाचावीं; एवढंच मी करीत होतें. पण वाचन वाचन तरी किती करणार ? मला संसार करायचा होता. मी यांची पत्नी आहे. पण राजा असून राज्य नसावं, त्याप्रमाणें माझं पत्नी-पद खालच्या वाड्यांतल्या त्या वेश्यापुत्रीकडे-तारेकडे होतं ! अन् हा माझ्यावरचा अन्याय मी उघड्या डोळ्यांनीं पहात असतां, वाचनांत माझा वेळ कसा जात असेल त्याची कल्पनाच केलेली बरी !

मी कुंकू सिनेमा पाहिला नसला तरी त्यावरची कादंबरी वाचली होती. पण या अन्यायाचा मी प्रतिकार केला नाहीं, मला करतां आला नाहीं !

पण दोन वर्षांच्या अवधींत तो आपोआपच होऊं लागला असं मला वाटलं. डॉ० सदानंद इथं आले, अन् त्यांनीं समाजसेवेचीं कामं सुरू केलीं. त्यांच्या समाजसुधारणेच्या कार्याला मी पैशाची मदत करूं लागलें. आणि थोड्याच दिवसांत भगवानचा जन्म झाला. त्याचें गोजिरवाणें मुख पाहिलें, त्याक्षणीं माझ्यावरचा सगळा अन्याय नाहींसा झाला असं मला वाटलं ! अन् त्यानंतर

त्यांच्यांतही पुष्कळसा फरक पडला. ते माझ्याशीं सरळपणानं बोलूं लागले. भगवानला खेळविण्याकरितां ते आंत येत. अन् त्याच्या बाललीलांचं कौतुक करून त्याच्या शिक्षणाबद्दल पुष्कळसं बोलत. डॉक्टरनां मी पैशाची मदत करतेंय हें त्यांच्या कानावर गेलं होतं. पण त्याबद्दल त्यांनीं एक शब्दहि काढला नाहीं. तेव्हां मला बराच धीर आला. मी आमच्या बंद गाडींतून आश्रमांत जाऊं लागलें. आणि कधींकधीं मळ्यांत सुद्धां ! ✗

त्यानंतर धक्का देणारी गोष्ट एकच घडली. भगवान चार वर्षांचा असेल त्यावेळीं. गांवांत एक मोठं बारसं साजरं झालं. मोठ्या कुतुहलानें मी चवकशी केली. ' खालच्या वाड्यांत तारेला मुलगा झाला, त्याचं बारसं असून त्याचें नांव सुरेंद्र ठेविलें.' इतकी बातमी मला कळली.

त्यावेळीं माझी मनस्थिति काय झाली असेल ते माझं मलाच माहीत ! त्यांचं तें सरळ बोलणं, वागणं न् दुपारीं दोनदोन तास चालणारी पूजा, सगळं मला ढोंग वाटलं; पण मी माझ्या मनाचा तोल जाऊं दिला नाहीं. त्याबद्दल जसा त्यांनीं एक शब्दही मला सांगितला नाहीं, तसं त्याबाबतींत आपणही कांहीं बोलायचं नाहीं, असं मी ठरविलं ! आणि आज भगवान, सुरेंद्र एवढे मोठे झाले तरी तो निश्चय मी पाळला !

दोन्हीं मुलांना त्यांनीं खूप शिकविलं. शिकविलं म्हणजे विरोध केला नाहीं, अन् लागतील तितके पैसे पाठविले इतकेंच. नाहींतर मराठी सातवीपर्यंत शिकलेल्या माणसाला शिक्षणांतलं कळायचं तरी काय ? कालच नाहीं का ? भगवानचा फोटो बघून त्यांना कोण हर्ष झाला ! पण त्याचं भाषण वाचून मात्र स्वारी चांगलीच दचकली !

अन् जसंजसं भगवानचं शिक्षण वाढत गेलं, तसतशा त्यांना धक्के बसणाऱ्या गोष्टीच त्याचेकडून घडल्या. शिक्षणासाठीं तो मुंबईला होता; तेव्हां तिथल्या अनेक चळवळींत तो सामील असायचा! आणि—सुट्टींत घरीं आला, कीं त्यानें शेतकऱ्यांची स्थिति बघावी, त्यांना निरनिराळ्या गोष्टी शिकवाव्या, अन् जरूर ती मदत करावी! त्याचें हें काम बघून मला आनंद वाटायचा. पण त्यांचें मस्तक उठायचें! आपल्यासारखाच शेतकऱ्यांना छळणारा आपला मुलगा निपजावा अशी त्यांची इच्छा असणं साहजिक होतं. अन् भगवानमध्यें असा फरक कां पडला हें त्यांना कळत नव्हतें. पण मी त्याबद्दल विचार करूं लागलें, कीं मला वाटायचं, 'शिक्षण हें अमृत आहे. तें स्वतः जगून दुसऱ्यालाही जगवितं!'

* * * *

शेतकरी बाहेर गेल्याचें दिसतांच मी पुन्हां वर गेलें. अन् उघड्या दारांतून दिवाणखान्यांत पाहिलें. त्यांचा चेहरा ओझरता दिसला किती फरक पडला होता त्यांत. लालभडक डोळ्यांतून त्वेष जणूं बाहेर उफाळत होता. अन् चंदनाचं पांढरं किंवा केशरी गंध ज्या कपाळावर असायचं तिथं आठ्यांचं जाळं माजलं होतं! विडीच्या धुराचे भपकारे सोडीत ते दिवाणजींना कांहींतरी मजकूर सांगत होते. त्यांच्या समोरच्याच गादीवर बसून दिवाणजी लिहीत होते. ते सांगत असलेल्या मजकुरांतील एकदोन वाक्यें माझ्या कानावर आदळलीं, 'यापुढं तूं माझा मुलगा नाहींस. तुझ्या त्या मजुरांच्या चळवळी अन् शेतकऱ्यांचं हित करीत कुठंही हिंड! परत घराकडे येऊं नकोस!'

ते भगवानला लिहीत होते हें नक्कीच ! तें ऐकून मला भान राहिलें नाहीं. मी धांवतच आंत गेलें. अन् दिवाणजीच्या हातांतला कागद घेऊन टार्कन् फाडून त्याचे तुकडे तुकडे केले. त्याबरोबर ते इंगळासारखे लाल झाले. अन् ती धगधगती दृष्टि माझ्याकडे रोखून म्हणाले, ' काय आरंभलंय तुम्ही हें ? '

' मी कांहींच आरंभलं नाहीं. तुम्हीं मात्र—'

' हां, तेंच बरोबर आहे. वाड्याला आग मीच लावली; शेतकऱ्यांना शेफारून मीच ठेवलं नि भगवानला बिघडून पण ! '

' नाहीं तर मी ? '

' हो तुम्ही. भगवान काय शिकतोय न् काय करतोय, हें माझ्यापेक्षां तुम्हालाच जास्त माहीत होतं. पण तुम्ही कधीं केलात कां त्याला विरोध ? '

' वाईट गोष्टीला विरोध करायचा असतो ! '

' अन् भगवान करतो तें सगळं चांगलंच ना ? दहावीस पिढ्या ही आमची जमिनदारी चालत आली. इतक्या वर्षांत कुळांनीं कधीं तोंडांतून ब्र काढला नाहीं. आतां तीं वाटेल तसं बोलतात, आग लावण्यापर्यंत त्यांची मजल गेली. अन् या गोष्टीला कारण भगवान आहे ! '

शद्वानं शब्द वाढू नये म्हणून मी काहीं बोललें नाहीं. पण माझ्या मनांत आलें, असेल कीं भगवान त्याला कारण.

राक्षसाच्या पोटीं राक्षसच जन्माला येतात असा कांहीं नियम नाहीं. कधीं कधीं देवसुद्धां जन्म घेतो. हिरण्यकश्यपूच्या पोटींच प्रल्हादाचा जन्म झाला नव्हता काय ?

मी त्यांना म्हटलं, ' कांहीं असलं तरी भगवान आपला मुलगा आहे. त्याला सांगून सवरून—'

' पुष्कळ सांगितलं कीं—पण त्याचा जन्मच अशा कांहीं विचित्र नक्षत्रावर झालाय, कीं जन्मापासून तो मला विरोधच करीत आला. लहानपणीं मला त्याचं कौतुक वाटलं. पण आतां मोठेंपणीं ? गेल्या वर्षीच नाहीं का तुम्हीं पाहिलं ! कौन्सिलमध्यें टेनन्सी बिल निघालं. मी जमिनदार संघ स्थापून त्याला विरोध केला. तर लगेच डॉक्टरनें न् यानें हजारों शेतकऱ्यांची सभा करून आमच्या संघाचा निषेध केला ! चंद्र सूर्य एक होतील पण दोन ध्रुव कधीं एक होतील कां ? म्हणूनच मी म्हणतो, भगवान माझा मुलगा नाहीं ! '

' असं कसं म्हणतां येईल ?'

' का ? मला मुलगा आहे कीं एक !'

' कुठं आहे ?'

' सुरेंद्र !'

विजेचा कडकडाट व्हावा तशीं मी दचकलें. माझ्या मना-पुढें भगवानचें भवितव्य उभें राहिलें ! उद्यां हे त्याला घरांतून बाहेर काढतील ! सुरेंद्र जमीनदार होईल. अन् माझा भगवान हजारों मजुरांना अन् लाखों शेतकऱ्यांना सुखी करण्यासाठीं देशभर फिरेल ! क्षणभर मला वाटलं, काय बिघडणार आहे त्यांत ? ' स्वतः जगण्यापेक्षां दुसऱ्याला जगविण्यांतच माणुसकी आहे, ' असं डॉक्टर म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. पण सुरेंद्र जमीनदार होणार अन् भगवान देशभर हिंडणार ही कल्पनाच सहन होईना मला !

त्यांना जेवायला न बोलावतांच मी खालीं आलें. थोड्याच वेळांत तेही बाहेर गेले.

राऊशिवाय सगळ्या शेतकऱ्यांनीं हंबीरविरुद्ध साक्ष द्यायचं कबूल केलं. त्या शेतकऱ्यांचीं मनं वळवून हंबीरला वांचवायला भगवानच यायला पाहिजे असं मला वाटत होतं. पण आतां भगवानलाच कसा वांचवायचा हा प्रश्न माझ्यापुढं होता. अन् त्या क्षणीं मी निश्चय केला, कीं आजपर्यंत सगळा अन्याय मी सहन केला. पण हा अन्याय मी सहन करणार नाहीं. वाटेल तें झालं तरी भगवानला मी या घराबाहेर पडूं देणार नाहीं.

आणि या विचारांत मी दिवसभर जेवलें नाहीं. अन् तेही जेवायला घरीं आले नाहींत!

———

## सुभद्रा

## : ४ :

मला केवढी आशा होती, माझी तार गेल्याबरोबर भगवान धांवत येतील, अन् माझ्या हंबीरला वांचवतील. पण मी तार केली, डॉक्टरनीं सविस्तर पत्र पाठविलं; तरीही ते आले नाहींत!

बापूंनीं बोलावून नेलेल्या सगळ्या शेतकऱ्यांनीं जर त्यांच्या-सारखी साक्ष दिली असती तर हंबीरला किती शिक्षा झाली असती कुणास ठाऊक! पण डॉक्टरनीं त्या सगळ्यांना बोलावून घेतलं, त्यांची कानउघाडणी केली अन् हंबीरविरुद्ध साक्ष न देण्याच्या जेव्हां त्यांच्याकडून शपथा घेतल्या, तेव्हां हंबीर सुटेल अशी खात्री वाटूं लागली. पण पैसा—न्यायासनाची कितीही थोरवी गायिली तरी त्यावर बसणारीं माणसं, माणसं नसतात! अडाणी शेतकऱ्यांनीं डोंगरासारखा वाटणारा पैशाचा मोह लाथाडला. पण शिकलेली माणसं—न्याय देणारे न्यायाधीश त्यांनीं पैशाचा मोह कां आव-

रावा ? बापूंनीं किती पैसे ओतले कळत नाहीं. कांहीं पुरावा नसता हंबीरला तीन महिन्यांची शिक्षा झाली.

कैद्याचे कपडे घालून हंबीरची तुरुंगांत रवानगी झाली, तेव्हां मी बाबा नि डॉक्टर त्याला भेटायला गेलों. आमच्याशीं बोलतांना त्याचा कंठ दाटून आला. स्वतःला शिक्षा झाली म्हणून त्याला वाईट वाटत नव्हतें. तो म्हणाला, 'एकाचा बळी जाऊन शंभर सुखी होणं हें वाईट नाहीं! पण त्या एकाबरोबर शंभरांना बळी जावं लागणं हें फार वाईट आहे! या खटल्याच्या बाबतींत एका धोंड्यानं दोन पक्षी मारण्याचं काम श्रीमंतांनींच करावं. आपल्यासारख्यांनीं चार धोंडे मारले तरी एकही पक्षी मरायचा नाहीं. ते धोंडे उलटून आपलाच कपाळमोक्ष मात्र व्हायचा! मला शिक्षा होऊं नये म्हणून तुम्ही बापूंच्या विरुद्ध गेलांत. पण मला शिक्षा झालीच. अन् तुम्हाला होणारा त्रास... तो होऊं नये म्हणून मी चार महिनेच काय चार वर्षांची शिक्षासुद्धां भोगीन.'

डॉक्टरांच्या चेहऱ्यावर स्मिताची रेषा चमकली. स्वतः जगण्यापेक्षां दुसऱ्याला जगविण्यांतच माणुसकी आहे, हें तत्व हंबीरच्या मनावर त्यांनींच बिंबवलं होतं.

जास्त बोलायला वेळ नव्हता. डोळ्यांत पाणी आणून शेवटीं त्यानं एकच गोष्ट सांगितली, 'आजपर्यंत आपण रडून जगलों असलों तरी ज्या क्षणाची मी आतुरतेनें वाट पाहात होतों, तो लढून जगण्याचा क्षण उद्यांपासून उगवणार आहे! पण त्या क्षणाचं सुख मला मिळणार नाहीं; म्हणूनच मला फार फार वाईट वाटतंय! आतां तरी रडून जगण्यापेक्षां लढून मरा, हेंच सर्वांना सांगा!'

पायांतल्या बेड्यांचा आवाज करीत त्यानं आमच्याकडं पाठ फिरवली अन् त्या क्षणीं न कळत ‘ हंबीर ’ म्हणून मी किंचाळलें, अन् बेशुद्ध झालें !

  

मी डोळे उघडलें तेव्हां आश्रमांतल्या बिछान्यावर होतें. हातांत पंखा घेऊन डॉक्टर मला वारा घालीत होतें. मी उठून बसण्याचा प्रयत्न केला. पण आंगांतली सगळी शक्ति नाहींशीं झाल्यासारखें मला वाटलें. डॉक्टरनीं मला स्वस्थ पडून रहायला सांगितलें.

मी डोळे झाकून कलंडलें. पण माझ्या डोळ्यापुढं ब्रह्मांड दिसूं लागलं ! आजपर्यंतचें माझें सगळें जीवन हंबीरच्या संगतींत गेलें होतें. शाळेंत आम्ही बरोबरच शिकलों. अन् शाळासुटल्यावर शेतांतली कामं—जोंधळा काढण्याचें, तूर बडवण्याचें किंवा उफणण्याचें—बरोबरच केलीं होतीं. वारा जोराचा सुटला अन् तो उफणण्यासाठीं वावडीवर उभा राहिला कीं मदनाच्या पाट्या मी इतक्या जलदीनं द्याव्या, कीं त्याला क्षणाचीही फुरसत मिळूं नये. तें पाहिलं, कीं वावडीखालीं बसून हाथणी मारणारे बाबा म्हणत, ‘ तुमच्या दोघांच्याही आंगांत जर असं वारं शिरलं, तर माझ्या हाथणी मारणाऱ्या हातांतलं वारं निघून जाईल. अन् सगळ्या दाण्यांत मग भोंडं राहातील ! ’

त्यावर माझ्याकडे बघून हंबीर म्हणे, ‘ पण मामा, या वाऱ्याचा मारा माझ्यावरच फार होतोय ! माझे हात बघा दमून गेलें. ’

‘ हात दमले, म्हणून भागणार नाहीं. वारा आहे तोंवरच उफणून घ्यायला पाहिजे ! ’ असं मी म्हटलं, कीं मग तिघांनाहीं हंसू येई.

जोंधळा काढतांना तर आपला आरा अगोदर काढून त्याचा आरा पुढून त्याच्याकडे काढीत येण्यासाठीं आमचीं अगदीं धडपड चालायची. गेल्या वर्षीचीच गोष्ट. पुढें जाण्यासाठीं मी ताटावर भराभर विळा चालवीत होतें. पण चुकून विळा एकदम माझ्या बोटाला लागला. 'अयाई!' म्हणून मी ओरडले. हंबीर माझ्याजवळ आला. त्यानं तें रक्त वाहणारं बोट हातांत धरलं. आणि आपल्या पटक्याची धांद काढून तें बांधलं! त्या जखमेची खूण अजून माझ्या बोटावर आहे.

शेतांतल काम संपलं, कीं संध्याकाळीं त्याच्या गाडींत बसून घरी जातांना सगळ्या कामाचा शीण नाहींसा झाल्यासारखा वाटे मला. त्याचे हौशा, सरदार हे बैल अगदीं हरणासारखे धांवत. अन् त्यांतच हंबीरनें गाण्याची झोड उठवावी. त्याचें तें नेहमीचें गाणें माझ्या कायमचं लक्षांत राहिलंय.

हौशाची ही सरदाराची
माझी जोडी जणूं हिऱ्याची
सरदारानें धांवत यावे
हौशानें हें जूं उचलावें
दौड बघावी मग गाडीची
क्षणांत येते दिड घराची

अन् या गाण्यांत घर केव्हांसं येई तें कळतसुद्धां नसे.

सुगीच्या दिवसांत रानांत वस्ती राहावं लागायचं. अन् त्याच दिवसांत थंडीचा अगदीं कहर असायचा. भरपूर कपडे नसले तरी आगटीमुळें थंडीचें पुष्कळच निवारण होतें. रात्रीं जेवणं झालीं, कीं आम्हीं त्या आगटीभोंवतीं बसत असूं. बाबांचा डोळा लागला तरी एकेक दिवशीं आम्ही पहाटे चांदणी उगवेपर्यंत बोलत बसलों होतों.

अन् त्या बोलण्याचा विषय, शेतकऱ्यांची सुधारणा कशी होईल, त्यांना सुख कसें मिळेल, त्यांना जमिनी कशा मिळतील हाच असे !

अशा एक कां दोन अनेक आठवणी माझ्या मनापुढें नाचूं लागल्या. अन् त्या आठवणींनीं मला अधिकाधिक दुःख होऊं लागलं. पण दुःख करीत बसून कसं चालणार? हंबीरचं तें वाक्य मला पुन्हां आठवलं, 'लढून जगण्याचा क्षण उद्यांपासून उगवणार आहे!' त्या लढाईसाठीं मी तयार व्हायला नको कां? पण मी एकटी कशी लढणार? पुरुष एकटेच लढूं शकतात. पण स्त्रियांना रडतांना अन् लढतांनाही जोडीदार हवा असतो! आणि माझा जोडीदार तर असा तुरुंगांत गेलेला. मी काय करूं?

विचाराच्या गुंगीत मला झोंप लागली असावी. पण अशी झोंप कधीं शांत लागते कां? एका तरुणानें माझा हात धरला, अन् मला उठविलें. त्याचा चेहरा थेट रावसाहेबासारखा होता. मला हात धरूनच तो चालवूं लागला. मी विचारलं, 'कुठं?'

'नदीवर'

'कशाला ?'

'जीव द्यायला !'

'तुम्हीसुद्धां जीव देणार ?'

'माझा जीव माझा नाहीं. तो मी देऊन टाकलाय !'

'कुणाला ?'

'कामकऱ्यांना, शेतकऱ्यांना. त्यांच्या सुखासाठीं झगडणें हें माझें ध्येय आहे !'

'माझंही तेंच ध्येय आहे !'

'पण तें रडून साधतां येत नाहीं.'

'मग ?'

'लढून !' लढण्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें मला पटलं. मी जागी झालें. पण रावसाहेबांची मूर्ति माझ्या डोळ्यांपुढून हलेना. गेलीं दोन वर्षे मी त्यांच्याबरोबर अनेक सामाजिक कार्यांत भाग घेतला होता. त्यांत शेतकऱ्याविषयींची त्यांची तळमळ मला क्षणोक्षणीं दिसली होती. पण उद्यां आम्हांला त्यांच्याविरुद्ध लढायचं होतं. त्यांच्याविरुद्धच नाहीं तर काय ? बापूसाहेब अन् ते काय दोन आहेत ?

दोन नाहींत अन् एकही नाहींत, हें तितकंच खरं आहे. ते एक असते तर मुंबईला मजुरांचा संप लढविण्यासाठीं ते कधींच गेले नसते, टेनन्सी बिलाचे वेळीं त्यांनीं आपल्या पित्याचा निषेध केला नसता, अन् शेतकऱ्यांची स्थिति पाहाण्यासाठीं ते त्यांच्या झोंपड्यांतून कधींही फिरले नसते !

काल हंबीरच्या खटल्यांत शेतकरी जे एवढे बापूंच्या विरुद्ध गेले ते कुणाच्या जिवावर ? बापूंचा शब्द ज्यांना हिटलरी हुकूम वाटत होता, त्यांच्यांत एवढी शक्ति कुठून आली ? रावसाहेब !

उद्यां जर शेतकऱ्यांच्या छळाला सुरवात झाली. तर त्याचें निवारण रावसाहेबच करूं शकतील !

हंबीरच्या खटल्यांत मला हीच आशा होती. म्हणून मी त्यांना तारही केली. पण ती आशा फोल ठरली. तशीच ही ठरली तर ? तर मला आशेला जागाच नव्हती !

म्हणून रावसाहेब मुंबईहून लवकर यावेत, असें मला वाटत होतें. ते येण्यासाठीं त्यांची खरडपट्टी करणारं पत्र लिहायचं मी ठरविलं ! अन् डॉक्टरांच्या टेबलावरची दौत टाक घेऊन मी लिहूं लागलें !

## भगवान

: ५ :

आजच्यासारखा आनंद मला आयुष्यांत कधीं झाला नव्हता. जिमखान्यावरच्या कुस्त्यांत सुवर्णपदक मिळालं त्यावेळीं जो मला आनंद झाला—बापूंनीं मोटार घेऊन दिली तेव्हां जितका मला हर्ष झाला किंवा युनिव्हर्सिटीनं मला बी. ए. ची पदवी बहाल केली तेव्हां जेवढा मला आनंद वाटला; त्या सर्व आनंदाची गोळाबेरीज केली तर ती आज वाटणाऱ्या आनंदाच्या पासंगालाही पुरणार नाहीं !

राजकुंवर गिरणींतल्या पांच हजार मजुरांचा संप लढवून तो मी यशस्वी करून दाखविला. पांच हजार माणसांच्या पोटापाण्याचा प्रश्न म्हणजे कांही लहानसहान बाब नाहीं ! संपाचा एकेक दिवस जात होता अन् मजुरांची अधिकाधिक खालावत जाणारी स्थिति बघून माझा जीव पिळवटून निघत होता. कित्येकवेळां मी धड जेवलोंसुद्धां नाहीं. अन् गेल्या दहा दिवसांत शांत झोंप तर मला

मिळालीच नाहीं. माझ्या शब्दावर विश्वास ठेवून पांच हजार माणसांपैकीं कित्येक अर्धपोटीं राहात होते. तर कित्येकांनीं आपलीं भांडींकुंडीं घाण ठेवून निभाव धरला होता.

आज त्याचें चीज झालें. मालकानें वाढवलेल्या तासांची मजुरी द्यायचं कबूल केलं. पण या दहा दिवसांचा पगार द्यायला कांहीं तो तयार नाहीं. एक दिवस कामाशिवाय राहिलं तर ज्यांना उपाशी बसावं लागतं, त्यांनीं या दहा दिवसांची कमाई कुठं बघायची ?

तरीपण वाढलेल्या तासांची मजुरी द्यायला मालक तयार झाला, यांतच सगळ्यांना आनंद वाटतोय. अन् त्याबद्दल आज शेवटची सभा होती. झाडून सगळे कामगार हजर होते. अन् प्रत्येकाचा चेहरा समाधानाच्या तेजानं चमकत होता. भाषणासाठीं मी समोर गेलों. पण सांगण्यासारखं आज काय होतं? आनंदानं माझा ऊर भरून आला होता. मी थोडंसंच बोललों. अन् शेवटीं सांगितलं, 'रडून मरण्यापेक्षां लढून जगा!' त्याबरोबर टाळ्यांचा कडकडाट नी माझ्या नांवाचा जयघोष एकदमच झाला. त्यानंतर माझ्या गळ्यांत किती हार पडले, ते दादूला मोजतांसुद्धां येईनात. त्याला वाटलं असेल, आपला धनीं देवासारखा आहे! पण देवापेक्षां माणूस असणंच चांगलं. हें त्याला काय कळणार? देव माणसाकडून सेवा घेतो. पण माणूस माणसांची सेवा करतो.

हारांचें ओझें सांवरित मी खोलींत पाय टाकला, तेव्हां टेबलावरचा डॉक्टरांचा फोटो हंसत आहे; असा मला भास झाला. दादूला तर कोण हर्ष झाला होता! माझ्या हातांतला एक गुच्छ घेऊन तो उड्या मारीतच बाहेर निघाला. मी विचारलं,

‘ कुठं निघालास ? ’

‘ कॉफी आणायला. ’

‘ नकोय मला कॉफी.’

‘ मी कॉफी आणत नाहीं. कोको ! ’ म्हणत तो पळालासुद्धां. मी डॉक्टरांना भक्तिभावानं वंदन केलं. अन् विचारलं,

‘ कां हंसता डॉक्टर ? ’

ते म्हणाले जणूं, ‘ हंसत नाहीं. तुझं अभिनंदन करतोय ! ’

‘ अभिनंदन ! तें तुम्हीं करायचं नाहीं. मी करायला पाहिजे तुमचं ! ’ खुर्चीवर बसत मी मनाशीं म्हटलं.

डॉक्टरांचा आदर्श पुढें होता, म्हणूनच मी कॉलेजचं क्रीडांगण सोडून या समरांगणांत उडी घेतली. अन् हजार पुस्तकं वाचूनही जें मला कळलं नसतं तें गेल्या दहा दिवसांत कळलं! पोटाच्या आगीनं सगळं जग पिडलं आहे. दिवसभर राबूनही पोटाला भरपूर न मिळाल्यामुळें, भीक मागणारे, चोरी करणारे नी रात्रीच्या रात्री फूटपाथच्या फरशीचा आश्रय करणारे मजूर थोडथोडके नाहींत ! अशा हजारों मजुरांनीं बाराचौदा तास फुकट राबावं, त्यांनीं आपल्या श्रमाचा योग्य तो मोबदलाही मागूं नये, असे गादीवर लोळणाऱ्या मालकांना वाटतं. मजुरांना पोट असतं ही गोष्ट मालक अजिबात विसरतात. मोटारी उडवायला, हिऱ्यामोत्यांचे दागिने घालायला किंवा नायकीण ठेवायला ते पैसे मागत नाहींत. त्यांना फक्त पोटाला हवं असतं. पण तेवढंही द्यायला मालक तयार नसतात ! मजूरांनीं पोटाला मागणं हा ते गुन्हा समजतात !

हा संप फोडण्यासाठीं मालकानें नाहीं त्या कारवाया केल्या. कुणाला पैसे देऊं केले, कुणाला माराची दहशत घातली आणि

मजुरांना उधार माल न मिळण्याची व्यवस्था केली. हें सगळं कशासाठीं, तर एकेक दिवस जाईल तसा त्यांचा नफा बुडत होता म्हणून. या गोष्टीं पाहून माझं पित्त खवळत होतं! मालकाला फक्त नफा दिसत होता. पण तो मिळवून देणारे हजारों मजूर त्याच्या खिसगणतींत नव्हते. अशा मजूरांना पाहिलं, कीं मला काव्यविहारींच्या ओळी आठवतात,

किती मजूर गिरणीमधले
राबतां राबतां मेले
तळमळतीं त्यांचीं पोरें
मोटारी उडवित फिरे मिजाशी, परि मालक गिरणीचा।

हजारोंनीं मरायचं अन् एकानं त्यांच्या जिवावर चैन करायची ही राक्षसीवृत्तीच नाहीं कां?

श्रीमंतांनीं चैनीसाठीं शिकायचं, मध्यमवर्गीयांनीं बी. ए. एम्. ए. च्या शेपटांवर नोकऱ्या मिळवायच्या अन् खालच्या समाजानं मात्र डोळे झाकून राबायचं! त्यांना चैन करतां यायची नाहीं, शिक्षण घेतां यायचं नाहीं, कीं सुखाच्या नोकऱ्या मिळायच्या नाहींत! जणूं तीं माणसंच नाहींत, जनावरं आहेत! अशांना माणुसकी मिळवून देणं हेच आजच्या तरुणांचं कर्तव्य नाहीं कां?

अन् केवळ याच हेतूनं मी शिक्षण सोडलं!

आईला वाटत होतं, माझ्या मुलानं विद्वान व्हावं न् कीर्ति मिळवावी. बापूंना वाटत होतं, मी वकील व्हावं. म्हणजे कुळावर कराव्या लागणाऱ्या फिर्यादीचे पैसे—जे दुसऱ्या वकिलांना द्यावे लागतात ते तरी वांचतील!

एवढी शिकलेली आई, पण विद्वान होऊन कीर्ति मिळविण्याचें दिवस मागेंच गेलें हें तिला कळत नाहीं. अन् बापू तर काय ? हजारों रुपये वर्षाकांठीं मिळत असले तरी त्यांना ते थोडेंच वाटतात ! मला पंचवीस रुपयाची कारकुनी कर, म्हणायलादेखील ते कमी करायचे नाहींत ! पण मला कुणाचंच ऐकायचं नव्हतं. डॉक्टर होऊन समाजसेवा करावी हें माझं ध्येय होतं. पण कामगारांची अन् शेतकऱ्यांची स्थिति जेव्हां मी प्रत्यक्ष पाहिली, तेव्हां मला कळून आलं, कीं त्यांना डॉक्टरची न् औषधांची जरुरी नाहीं. त्यांना फक्त पोटाचं औषध हवं आहे. अन् हें औषध डॉक्टरी शिकून देतां येणार नाहीं. त्याकरितां लढावं लागणार आहे ! हें कळलं तसा मला एक प्रकारचा आनंदच झाला. लढण्यांत काय कमी सुख असतं ? मी गरिबासाठीं लढायचं ठरविलं !

  

‘ रावसाब ’ या दादूच्या हाकेनं मी मागं वळून पाहिलं. त्यानं कोकोचा कप भरून ठेवला होता. मी कोको घेत असतां तो म्हणाला,

‘ संपलं नव्हं कां इथलं काम ? आतां घरीं कधीं जायचं ? ’

‘ कां, इतक्यांतच कंटाळलास काय मुंबईला ? ’

‘ तसं नव्हं. पण आजचा आनंद एकदां आईसाबांना अन् डॉक्टरना केव्हां सांगिनसं झालंय मला ! शिवाय तिकडं काय झालं असंल त्याचीही हूरहूर लागलीय जिवाला. मागं बापूसाबांची अन् सुभद्राताईंची तार आली नव्हती कां ? ’

असें म्हणून तो टेबलाकडे गेला. बाजूच्या ड्रॉवरचा वरचाच खण त्यानें उघडला. अन् त्यांतून एक पत्र काढून तें माझ्या हातांत देत तो म्हणाला, ‘ मी विसरलोंच होतों बघा. हें दुपारीं

आलंय!' मी उत्सुकतेनं तें न्याहाळून पाहिलं. वर पाठविणाराचें नांव नव्हतें. अक्षरमात्र सुभद्रेचें दिसत होतें. अन् तिकिटावरचा पोस्टाचा पुसट शिक्काही बोरगांवचा होता. मला निकडीनें बोलावणाऱ्या दोन तारा आल्यावर डॉक्टरांचे पत्र आलें होतें. पण त्यानंतर बोरगांवची कांहींच हकिकत मला कळली नव्हती! ती आज कळेल म्हणून मी पत्र फोडलें. सुरवातीला 'प्रिय रावसाहेब, असं होतं. म्हणून मी शेवटची सही पाहिली,

'तुमची सुभद्रा'

सुभद्रेचं मला हें पहिलंच पत्र. दीड वर्ष आम्हीं एकत्र काम केलं. एका शेतकऱ्याची मुलगी ही. शिक्षणही फार नाहीं. पण तिची काम करण्याची. तरतरी, गरिबांबद्दलची सहानुभूति वगैरे गोष्टी पाहून मला तिच्याबद्दल आपलेपणा वाटत होता. तसंच माझ्याबद्दल तिला आदर वाटत असल्याचं कित्येकवेळां मला दिसून आलं होतं. पण त्यापेक्षां माझ्याबद्दल तिच्या कांहीं निराळ्या भावना असतील, याची मला कल्पनाच नव्हती.

'तुमची सुभद्रा.' प्रत्यक्ष सहवासापेक्षां पत्रंच अधिक बोलकी असतात म्हणायची! माझ्या मनाचा मलाच राग आला. माणसाचं मन पाण्यासारखं असतं म्हणतात! मी म्हणतो तें बर्फासारखं असतं! जोपर्यंत तें घट्ट आहे तोपर्यंत ठीक. पण एकदां तें विरघळलं, कीं मग त्याच्या वाहण्याला कांहींच मर्यादा राहायची नाहीं. आतांचंच पाहाना. 'तुमची' या शब्दाचा माझ्या मनानं एवढा कस कां बघावा? दीड वर्ष ती ज्या निर्विकार मनानं माझ्याशीं वागली, त्याच निर्विकार मनानं तिनं 'तुमची सुभद्रा' असं लिहिलं नसेल कशावरून?

मी पत्र वाचूं लागलों,

'प्रिय रावसाहेब,'

जरुरीचे निरोप लवकर पोचण्यासाठीं तारखातं निर्माण झालं. पण त्या लवकर पोंचणाऱ्या निरोपाप्रमाणें माणसाला लवकर वागायला लावणारं यंत्रही तयार व्हायला हवं होतं! म्हणजे निरोप पोचून स्वस्थ बसणाऱ्या अन् त्याचें उत्तरही न पाठविणाऱ्या माणसांना चांगलींच अद्दल घडली असती!

तुम्हीं ताबडतोब याल या आशेनं मी तार पाठविली. पण ती माझी आशा फोल ठरली! बाकी गरिबांच्या कोणत्या आशेला फळ येतं म्हणा!

तुम्ही म्हणाल, मी मुंबईला गेलों ते काय आट्यापाट्या किंवा खोखो खेळायला नाहीं. मजुरांसाठीं लढायला!

मी कबूल करतें तें. पण मुंबईच्या मजुरासाठीं तुम्ही ज्यावेळीं लढत होता, त्याचवेळीं तुमच्या घरचे शेतकरी मात्र रडत होते. त्यांना कोण रडवत होतं? तुम्ही.

रावसाहेब,

ओल्या वाळल्या झोंपड्यांत राहणाऱ्या शेतकऱ्यांना तुम्ही मोठ्या दयेनं वाड्यांत राहायला जागा दिली. पण मोठ्या जागा त्यांना कशा मानवतील? त्या वाड्यांत राहाण्यानंच त्यांच्यावर महान् संकट आलंय! आग लावली म्हणून हंबीरला शिक्षा झाली. अन् 'त्यानं आग लावली.' अशा साक्षी दिल्या नाहींत; म्हणून सगळ्या शेतकऱ्यावर बापूसाहेब खवळलेत. श्रीमंताचा राग हा ज्वालामुखी आहे. अन् हा ज्वालामुखी काय करील त्याचा नेम आहे कां?

आश्रमांतूनही बापूसाहेब शेतकऱ्यांना हांकलून काढणार आहेत. अन् कुणाला जमिनी न देण्याचाही त्यांनीं निश्चय केला आहे. शेतकऱ्यांनीं जगायचं कसं ?

तुमच्या वाटेकडे ते डोळे लावून बसलेत. तुमचीच एक त्यांना मोठी आशा आहे. ही 'फोल आशा' ठरणार नाहीं ना ? तुम्ही याल ना ? माझी खात्री आहे, गरिबांच्या हांकेला ओ देणारे राव-साहेब धांवत धांवत येतील !

तुमची

सुभद्रा'

पत्र संपलं तरी खालीं तीन चार कागद होते. पहिल्याच काग-दावर मथळा होता, 'फोल आशा' ती गोष्ट होती नक्कीच. मी मनांत म्हटलें, 'सुभद्रा आतां लेखिका झाली कीं—'

माझ्या वाड्याला आग लावणाऱ्या हंबीरला मी वांचवावा अशी तिची आशा असणार. ती आशा मी फोल ठरविली. अर्थात् ती गोष्ट माझ्यावर असायची असं मला वाटलं. ती गोष्ट मी वाचूं लागलों,

## फोल आशा !

रांपणींतून चुकून पडलेला मासा कांठावरच्या वाळूंत तळमळत होता. पाण्याशिवाय त्याला कसं जगतां येईल! जीव नरड्याशीं आला होता त्याचा. त्यानें किलकिल्या डोळ्यानें इकडे तिकडे पाहिलें. त्याचा जीवदाता अफाट सागर बाजूला पसरला होता.

प्रेतकळा आलेल्या त्याच्या चेहऱ्यावर क्षणमात्र समाधानाची लकेर चमकली! त्याला वाटलं, लाखो जलचरांचा सांभाळ करणारा

दयाशील सागर जवळ असतांना आपणाला मरणाची भीति कां ? काळदाढेंत गेलों तरी सोडवून घेण्याचें सामर्थ्य आहे या सागराजवळ! माझ्यावर त्याचं प्रेमही तसंच आहे, मी हांक मारल्याबरोबर धावत येऊन मला घेऊन जाईल. ' केवढी, केवढी आशा वाटली त्या माशाला !

त्यानें करुणस्वरानें हांक मारली, ' सागरा, '

लाटांच्या तांडवनृत्यांत सागराची स्वारी दंग झाली होती. मरणोन्मुख झालेल्या त्या माशाची खोल हांक त्याला कशी ऐकूं जाणार !

लाटांचा धांगडधिंगा थोडासा कमी झाल्यावर माशानें पुन्हां आळविलें, ' सागर महाराज ! '

' महाराज ' या शब्दाच्या प्रभावानें, कीं काय कुणास ठाऊक ! सागरानें विचारलें, ' कोण ते ? '

' मी, मराय लागलोंय मी ! '

' म्हणून कांहीं सुतक येणार नाहीं मला ! '

' पण तुमच्याशिवाय जगतां येत नाहीं मला. यासमयीं तुम्हींच मला जीवदान द्या, परमेश्वर व्हा माझे ! '

' उद्यां सगळं जग ओस पडेल म्हण कीं तुझ्यावांचून. '

पण तें माशाला ऐकूं गेलं नाहीं. आत्यंतिक वेदनेनं तो कळवळला, ' सागर महाराज या, या. जरा हात द्याहो ! '

अनेकवेळां सागर त्या वाळूवर जात होता. पण एका माशानं बोलावल्यावरून जायचं ! त्याला अपमानाचें वाटलें तें. जातां येत असून तो गेला नाहीं.

माशानें पुन्हां हाक मारण्यासाठीं जुलमानें तोंड उघडलें. पण तें पुन्हां झाकणें त्याच्या स्वाधीनचें राहिलें नाहीं.

मी कागद खालीं ठेवले. माझ्या मनाला वाटलं, जगाला चंद्राचा प्रकाश दिसत नाहीं, त्याचा कलंक बघून नाकें मुरडायचीं तेवढीं कळतात ! एका माशाला जगविलं नाहीं म्हणून सागराला दोष देतांना, लक्षावधि जलचरांचं तो संगोपन करतो, ही गोष्ट दृष्टि-आड करून कसं चालेल !

एका हंबीरपेक्षां पांच हजार मजुरांचा प्रश्नच अधिक महत्वाचा होता. पण बोरगांवांत बसलेल्या सुभद्रेला हें कळायचं कसं ?

बाहेर दादू कुणाशीं तरी बोलत होता. मी विचारलं,

' कोण आहे ? '

' तुम्हाला भेटायला माणसं आल्याती ! '

' मग आंत लावून दे ना ! '

मजुरांपैकींच तिघेचौघेजण होते. ते आंत येऊन बसले. त्यांच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत कृतज्ञता नाचत होती. बराच वेळ ते कांहींच बोलले नाहींत. तेव्हां मीच म्हटलं,

' कांहीं काम होतं कां ? '

' देवळांत लोक जातात ते, कांहीं काम असतं म्हणून नाहीं !'

' तर कशाला ? '

' देवाच्या दर्शनाला. '

' पण मी देव नाहीं. माणूस आहे ! '

' देव कांहीं आकाशांतून पडत नाहींत. माणसांतूनच ते निर्माण होतात. '

'मग देवाकडं काय मागायचंय ?'

'मागणं मागाला आलों नाहीं–'

'तर नवस करायला?'

'अंहं. फूल वहायला!'

असं म्हणत एकानं आपल्या खिशांतलं पाकीट काढलं, आणि त्यांतून तीस रुपयांच्या नोटा काढून माझ्यापुढें ठेवल्या. मला त्याचा अर्थच कळेना. मी म्हटलं,

'काय हें?'

'फूल.'

'कागदीं फूल दिसतंय हें! कागदीं फुलं देवाला आवडत नाहींत! ठेवा तें पाकिटांत.'

'तुमच्या खर्चासाठीं हे सगळ्यांनीं मिळून दिलेत. हे तुम्ही घेतलेच पाहिजेत.'

मजुरांची स्थिति माझ्या डोळ्यापुढें होती. दुपारच्या पेजेची ज्यांना वाण होती त्यांनीं माझ्या खर्चासाठीं तीस रुपये जमवून द्यावेत! त्यांच्या कृतज्ञतेची कमाल झाली. मी म्हटलें, 'मुंबईहून बोरगांवला जायला कांहीं इतके पैसे लागत नाहींत!'

'दुसऱ्या वर्गाचं तिकिट याहूनही जास्त असंल!'

'असंना दुसऱ्याच काय पहिल्याहूनही जास्त पहिला असा वर्ग निघाला, तरी त्या वर्गांतून रोज मुंबईच्या फेऱ्या करण्याइतके पैसे माझ्याजवळ आहेत. यांतली एक पैही मी घेणार नाहीं!'

ते आपला आग्रह अजिबातच सोडीनात. तेव्हां कामगारांच्या शाळेला देण्यासाठीं ते पैसे मी ठेवून घेतले. त्यांनीं जातांना विचारलं, 'मग चार दिवस राहणार ना?'

मी म्हटलं, ' नाहीं. घरींही फार कामं आहेत. आजच पत्र आलंय तावडतोब या म्हणून. उद्यां मला गेलंच पाहिजे ! '

तें दादूनं ऐकलं. त्याला आनंद झाला असेल, उद्यां आपणांला गांवीं जायला मिळणार म्हणून !

   

रोजच्या अपुऱ्या झोंपेनं डोळे कसे भारावले होते. म्हणून आज आठलाच झोंपायचा मी निश्चय केला होता. पण अकरा वाजले तरी मला झोंप येईना. मी उठून खिडकींतून बाहेर पाहिलें. चंद्र बराच वर आला होता. पण त्याचें चांदणं विजेच्या प्रकाशानं मारून टाकलें होतें ! सातआठ मजली इमारती सोडल्या तर रस्त्या-वरच्या लोकांना चंद्र उगवलाय याची दादसुद्धां नसेल ! रहदारी थोडीशी कमी झाल्यासारखी वाटत होती. पण वाहनांची अन् माणसांची धांवपळ चालूच होती. रस्त्यावरच्या अन् उघड्या दुकानांतल्या दिव्यांचा प्रकाश एकवटला होता. व त्यांतून मोटारीच्या दिव्यांचा प्रकाश नाचत पळत होता. त्या प्रकाशांत वाहनांच्या पळणाऱ्या पुसट छाया किती मनोहर दिसत होत्या. एका इमारतींतून सुरेल संगीताचे स्वर माझ्या कानावर आले. तर समोरच्या इमारतींत चाललेल्या घाटी लोकांच्या भजनांतील ' जय विठ्ठल, जयजय विठ्ठल ' यानें माझें डोकें उठविलें. मी उंच उंच इमारतीकडें पाहिलें. चांदण्यामुळें त्या दुधांत न्हाल्यासारख्या दिसत होत्या. त्यांच्याकडे बघून मी नकळत काणेकरांच्या ओळी गुणगुणूं लागलों,

चांदरात पसरिते पांढरी माया धरणीवरीं,
लागली ओढ कशी अंतरीं
बेफाम पसरितें पंख हृदयपांखरूं
उडुनिया पहातें अनंत अंबर भरू
या इवल्या देहीं कसें तया आवरूं
चैन पडेना, काय करूं ही आग लागली उरीं,
लागली ओढ कशी अंतरीं ।

आज इथलें काम संपलें असतांना मी इथं कां राहिलों ? आजच मी बोरगांवला कां गेलों नाहीं ? माझ्या मनाला ओढ लागली होती. अन् ती साधी नव्हती, अगदीं संगीत-प्रणयाची होती ! दोन दिवसांपूर्वी आजारी असल्याची आईची तार आल्यामुळें पद्मा नाशीकला गेली होती. तिनं दोन दिवसांत यायचं कबूल केलं होतं. पण आज ती आली नाहीं. अन् तिचं पत्रही नाहीं. तिच्यासाठीं मी आज थांबलों. अन् उद्यां परवांदेखील थांबणार होतों.

मी खोलींत पाहिलें, तिथें अंधार होता. मी लवकर झोंपणार हें माहीत असल्यामुळें दादूनें सगळे दिवे मालविले होते. बटन दाबून मला क्षणांत उजेड करतां आला असता. पण सगळ्या जगांत भरलेला काळाकुट्ट अंधार-अन् तो एक प्रकारचा नाहीं; अज्ञानाचा, विषमतेचा, दारिद्र्याचा तो कसा नाहींसा करायचा ? तो नाहींसा झाल्याशिवाय मी प्रणयाच्या चिखलांत लोळायचं म्हणजे—

माझा मलाच राग आला. मी अंधारांतच डॉक्टरांच्या फोटोची क्षमा मागितली. लोकसेवेच्या व्रताला अडथळा होऊं नये म्हणून

ते आजन्म ब्रह्मचारी राहिले. अन् एवढ्या मोठ्या गुरूचा शिष्य मात्र—

दादू जागाच असावा. तो म्हणाला, 'अजून झोंपला नाहींसा रावसाब ?'

'उद्यां गांवीं जायचं नाहीं कां ? त्यामुळं झोंपच येईना बघ.'

'तर तर! मला म्हणत होतासा ना, इतक्यांतच मुंबईला कटाळलास काय म्हणून. अन् आतां ? पण तुम्हाल्ली झ्वाप कां येत नाहीं तें मला ठाऊक हाय !'

'कां ?'

'पद्माताई येणार व्हत्या ना आपल्याबरोबर बोरगांवला. त्या आज आल्या नाहींत म्हणून.'

'खुळा कुठला !' म्हणत मी पलंगावर आंग टाकलें.

   

उजाडतांच मी दादूला सामानाची आंवराआंवर करायला सांगितलें, अन् राजकुंवर गिरणींत गेलों. सगळे कामगार हजर होते. मला पहातांच त्यांनीं जयघोष केला. अन् माझा निरोप घेऊन ते आपापल्या कामावर हजर झाले. तिथून मी खोलीवर आलों तों पद्माचं पत्र आलें होतें. त्यांत तिनें लिहिलं होतें,

'प्रिय भगवान,

मी ज्यावेळीं हें पत्र लिहित आहे, त्यावेळीं तिथं पोचायला हवी होतें. पण परिस्थितीची भिंत—या भिंतीवरून मी उडी मारूनच तुमच्याकडे आलें असतें. पण माझ्या आईकडे पाहिलं कीं—

एकशेंचार डिग्री ताप आहे तिला. अन् काल डॉक्टरनीं सांगितलं मुदतीचा ताप आहे म्हणून. अगदीं लहानपणापासून मी पाहातेंय, दुसरं कुणी कुणी नाहीं हो आम्हाला! आईला मी न् मला आई! असं कां, याबद्दल मी आईला विचारलं, कीं ती मला जवळ घेते, अन् डोळयांत पाणीं आणून म्हणते, 'पद्मा, याबाबतींत तूं कांहीं न विचारलेलंच बरं!'

तुम्हाला आश्चर्य वाटेल, माझी आई एवढी शिकलेली, एका हायस्कुलांत शिक्षकीण असलेली, ती कधीं कुठल्या देवाला जात नाहीं. पण रोज एका अंगठीची पूजा करते. आतां एवढी आजारी आहे, तर त्या आंगठीला फूल वाहायला ती मला सांगते. काल ती आंगठी मी न्याहाळून पाहिलीं. तीवर इंग्रजी 'एस्' सारखे एक अक्षर आहे. या आंगठीची पूजा करीतच तिनें मला लहानाची मोठी केली, लागेल तितका पैसा खर्चून मला शिक्षण दिलें. आतां तुम्हीच सांगा, माझं जीवन सर्वस्व असलेल्या या आईला अशा स्थितींत टाकून मला येतां येणं शक्य आहे कां?

कालच्या वृत्तपत्रांत संप यशस्वी होईल, अशा बातम्या वाचल्या. ज्या दिवशीं तो यशस्वी होईल त्या दिवशीं तुमचं अभिनंदन करायला मी तिथं नाहीं; म्हणून मला फार वाईट वाटतंय! आणखी एका गोष्टीबद्दल वाईट वाटतंय. कोणत्या सांगू? मी तुमच्याबरोबर बोरगांवला यायचं कबूल केलं होतं. तुमचे ते डॉक्टर, शेतकरी अन् तुमचे वाडे, मळे, जमिनी बघायची मला फार फार इच्छा होती. पण...

आतां पुढं केव्हां तरी मला आलंच पाहिजे! आईला बरं वाटतांच, मी तुमची सगळी माहिती तिला सांगणार आहे. कित्ती

कित्ती आनंद वाटेल तिला! तुम्ही बोरगांवला जाल तेव्हां मला जरूर कळवा हं!

तुमचीच

पद्मा '

तिच्या आईच्या आजाराची बातमी ऐकून मला धक्काच बसला. पद्माच्या पत्रावरून कांहीं कळत नव्हतें. तरी तिची स्थिति भांबावल्यासारखी झाली असेल! क्षणभर मला वाटलें, आपण नाशीकलाच जावं. पण बोरगांवला जाणंही तितकंच जरूर होतं. मी तिला एक पत्र लिहून टाकलें.

दादूनं सगळं सामान बांधलं होतं. अकराच्या गाडीनें मी बोरगांवला जाण्यासाठीं निघालों.

---

## तारा

## : ६ :

मी पूर्वेच्या खिडकींतून बाहेर पाहिलें. सूर्य नुकतांच उगवला होता. तरीपण मला उठायची इच्छा होईना. त्या गोड स्वप्नाच्या गुंगींत पुन्हां झोपावं असं मला वाटत होतं. पण स्वप्नं म्हणजे काय हिऱ्यामोत्याचे दागिने नव्हेत! कपाट उघडून हवा तो दागिना घेतां येतो, म्हणून डोळे झांकून हवें तें स्वप्न थोडेंच पडतें! मी पुष्कळ प्रयत्न केला. पण जिथं झोंपच येईना तिथं स्वप्न कसलं पडणार!

मी झटकन् उठलें. न्हाणीघरांत जाऊन चूल भरली. पण माझ्या डोळ्यापुढून तें स्वप्नांतील दृश्य कांहीं केल्या दूर होईना—त्यांनीं रागारागानं भगवानला घराबाहेर काढलाय. सगळी इस्टेट माझ्या सुरेंद्राच्या नांवची केलीय. अन् दहा हजार रुपये हुंडा देणाऱ्या एका इनामदाराच्या मुलीशीं सुरेंद्राचं लग्न मोठ्या थाटानं होतंय!

पण अशा स्वप्नांत मी रमायचं म्हणजे हिरा टाकून कोळशाला कवटाळण्यासारखंच होतं. नाहींतर सत्य गोष्टीच्या स्वप्नांत रमण्याचा वेडेपणा कुणीतरी करील कां ?

माझं सगळं जीवन सुखांत गेलं असलं तरी माझा विवाह झाला नसल्यामुळें सुरेंद्राचा जन्म कलंकित ठरत होता. सगळं जग त्याला रखेलीचा मुलगा म्हणत होतं. उभा जन्म मी बापूसाहेबांच्या सेवेंत घालविला. लग्नाच्या पत्नीपेक्षांही मी त्यांच्याशीं एकनिष्ठपणें वागलें नि देवाधर्माचें नेम मी कधीं चुकविले नाहींत. पण नीतीच्या जीर्ण पडद्यांतून पाहाणाऱ्या जगाला हें दिसत नाहीं. पतीला लाथाडून चोरून परगृहीं गमन करणाऱ्या स्त्रिया जगाच्या दृष्टीनें पतिव्रता ठरतात. पण माझ्यासारखी स्त्री कितीही नीतीनं वागली, तरी ती कलंकितच राहते !

म्हणून सुरेंद्राचा जन्म झाल्यापासून मी एका गोष्टीची खबरदारी घेतली होती; ती म्हणजे आपला जन्म असा आहे ही गोष्ट त्याला कळूं नये. पण जेव्हां त्याचं वय वाढलं अन् तो जगांत वावरूं लागला, तेव्हां ती गोष्ट त्याच्या कानांवर गेल्यावांचून राहिली नाहीं.

इथल्या शाळेंत असतांना कांहीं मुलाबरोबर तो एकदां सागरेश्वराला गेला. तिथनं तो घरी आला, तो रडतच ! मी त्याला रडण्याचं कारण विचारलं. तेव्हां त्यानं सांगितलं, ‘ माझ्या बरोबरच्या मुलांनीं मला मिसळून घेतलं नाहीं. अन् जेवायला बसायच्यावेळीं तर ते सगळेजण कोंडाळं करून बसले. अन् मला एकट्यालाच बाजूला बसविलं. ’

त्याची समजूत करण्याऐवजीं मलाच रडूं कोसळलं. इतक्या अल्पवयांत जर सुरेंद्राला जग कलंकित ठरवूं लागलं, तर पुढं कसं होणार ? त्याला मानानं जगतांच येणार नाहीं कां ?

तो पुढं सांगूं लागला, ‘ मला भारी राग आला त्या मुलांचा. मी त्यांना विचारलं, ‘ मलाच कां रे बाजूला बसवतां ? ’

त्यांच्यांतला एक दाणगट मुलगा म्हणाला, ‘ तूं आमच्यांतला नाहींस ! ’

‘ म्हणजे ? ’

‘ ठेवलेल्या आईचा तूं मुलगा आहेस ! ’

‘ ठेवलेल्या म्हणजे काय ? ’

‘ तुझ्या आईचं लग्न झालं नाहीं ! ’

‘ खरंच आई, तुझं लग्न झालं नाहीं ? ’

काय सांगायचं त्याला ! मी मानेनंच ‘ नाहीं ’ म्हटलं. त्याला जवळ घेतला. त्याचे डोळे पुसले. अन् हंसत म्हटलं, ‘ आतां आपण तुझ्या बापूंना सांगूं. अन् चांगलीच खोड मोडूं त्या पोरांची ! ’

पण त्या माझ्या सांगण्यानं त्याची समजूत पटली नाहीं. त्यानें पुन्हां मला विचारले, ‘ तूं लग्न कां केलं नाहींस ? ’

‘ कां केलं नाहीं ! ’

मी माझ्या मनाला विचारलं. पण त्याचं उत्तर जिथं मलाच मिळालं नव्हतं, तिथं मी सुरेंद्राला काय सांगणार ! त्याला मी अधिकच पोटाशीं धरला. अन् न कळत माझे अश्रू त्याच्या मुखावर पडूं लागले !

भयंकर हळव्या मनाचा आहे तो. तेव्हांपासून त्याच्या चेहऱ्यावर जी एक निराशेची छटा दिसूं लागली ती अजून कायम आहे. ज्याच्या चेहऱ्याकडे पाहून मी स्वर्गसुख मानावं, तोच असा जेव्हां उद्विग्न दिसूं लागला, तेव्हां पासून माझ्या जिवाची सारखी तळमळ होऊं लागली. परिक्षेंत नेहमीं पहिला नंबर मिळविणाऱ्या, बालगंधर्वासारखं गोड गाणाऱ्या अन् पोहणं, कुस्ती, क्रिकेट यांतही रमणाऱ्या सुरेंद्राला, केवळ माझ्यामुळं कलंक लागावा अन् निराश होण्याची पाळी यावी, ही गोष्ट माझ्या मनाला सारखी जाळूं लागली! अन् हा त्याचा कलक नाहींसा करण्याच्या खटपटीला मी लागलें.

मला माहीत होतं, श्रीमंतींत सगळे दोष झांकले जातात! भगवान बरोबर सुरेंद्र जर निम्म्या इस्टेटीचा मालक झाला, तर या कलंकाचं वारंदेखील त्याला लागायचं नाहीं. म्हणून मी सारखी बापूसाहेबांच्या पाठीस लागलें होतें, ' कांहीं करून निम्मी इस्टेट सुरेंद्राच्या नांवची झालीच पाहिजे म्हणून!'

आतांपर्यंत त्यांनीं ' होय होय ' म्हणण्यापेक्षां कांहींच केलं नव्हतं! पण त्या दिवशीं निम्मीच काय सगळी इस्टेट सुरेंद्रालाच देण्याचं त्यांनीं माझ्या समक्ष ठरविलं!

समाजसेवा करीत भगवान जसजसा बहकत चालला, तसतसं यांचं मन त्याच्या विषयीं विटत चाललं! परवां मुंबईला जातांना त्यानं न विचारतांच शेतकऱ्यांना बाहेरचा वाडा खुला करून दिला. तें कळताच यांनीं त्या शेतकऱ्यांना तिथून बाहेर काढलं. पण जेव्हां त्या वाड्याला आग लागली, तेव्हां मात्र हे चांगलेच खवळले!

एकपरी तें बरंच झालं नाहीं कां!

त्या संतापाच्या भरांत हे भगवानला, ‘ तूं माझा मुलगा नाहींस, वाटेल तिकडं हिंड. ’ असं कांहीं तरी लिहीत होते. त्याच वेळीं बाईसाहेब तिथं आल्या. अन् त्यांनीं तो कागदच फाडून टाकला म्हणे. भयंकरच संतापले हे. बाईसाहेबांनाही काय वाटेल ते बोलले. अन् त्यानंतर माझ्याकडे आले. तोच दिवस सुरेंद्राच्या भाग्याचा ठरला!

दरवाजांतूनच ते मोठ्यानं ओरडले, ‘ तारा, तारे लवकर खालीं ये. ’

मी झटकन् पुढें गेलें. माझा हात धरून ते म्हणाले, ‘ तारा माझी खरी पत्नी तूं आहेस ! ’

मी मनांत ओळखलंच. तिकडं कांहींतरी खटका उडाला असेल. त्यावांचून अशी भाषा यायचीच नाहीं. त्या ठराविक शब्दांचा मला वीट आला होता. मी जरा रागानेंच म्हटलें,

‘ अं हं. रखेली ! ’

‘ गादीवर बसली म्हणजे रखेलीची राणी होते. ’

‘ गादीवर बसली तर ! नाहीं तर जगाच्या पायदळीं तुडवली जाऊन तिची माती बनते! ’

‘ पण अगोदर वर तरी चल ! ’

मी त्यांचा हात धरूनच त्यांना उजव्या बाजूच्या जिन्यांतून माडीवर नेलें. कोचावर आंग टाकतां टाकतां ते म्हणाले,

‘ सुरेंद्राला आत्तांच्या आत्तां बोलावून घे ! ’

मला त्यांच्या बोलण्याचा अर्थच कळेना. मी विचारलें, ‘कां?’ त्याला जाऊन तर पुरता महिनाही झाला नाहीं. ’

‘ कां तें सांगतां येत नाहीं. पण आपला मुलगा आपल्याजवळ

असावा असं वाटतयं मला !'

'मग येईल कीं तुमचा मुलगा मुंबईहून.'

'कोण ?'

'भगवान.'

'तो माझा मुलगा नाहीं! माझा मुलगा सुरेंद्र आहे. गरिबांचा कैवार घेऊन भांडणाऱ्या मुलाच्या स्वाधीन सगळी इस्टेट केली, तर म्हातारपणीं आम्हांला हातांत झोळी घेऊनच फिरलं पाहिजे! मी सगळी इस्टेट सुरेंद्राच्या नांवची करणार आहे !'

प्रथमच त्यांच्या तोंडातून ते शब्द निघत होते. तें ऐकून मला जितका आनंद झाला तितकाच अविश्वास वाटला! एकदां वाटे, मनानं अमुक करायचं ठरविल्यावर तें केल्यावांचून ते कधींच राहायचे नाहींत. पण पुन्हां वाटे, हें शक्य होईल कां? कांहीं झालं तरी भगवान त्यांचा औरस पुत्र! त्याला सोडून सगळी इस्टेट सुरेंद्राच्या नांवची करणं, हें लोकांच्या दृष्टीनं, कायद्याच्या दृष्टीनं-त्यांना शक्य आहे कां? शिवाय भगवाननं विरोध केला तर! म्हणून मी म्हटलं, 'भगवान कांहीं आतां लहान नाहीं. तो कसं तसं करूं देईल?'

'त्याचा काय संबंध? मी वाटेल तें करीन!'

मी त्यांच्या खांद्यावर हात ठेवीत म्हटलं 'बघा हं!'

'बघतेस काय, आज आपला अगदीं निर्धार झालाय! तूं सुरेंद्राला बोलावून घे कशी अगोदर!'

मला केवढा हर्ष झाला. मी लगबगीनें त्यांच्याकरितां चहा करायला निघालें. तेव्हां ते म्हणाले, 'मला चहा नकोय आतां.

सकाळपासून जेवण तर नाहींच, पण चहादेखील घेतला नाहीं मी. मला जेवायचंय आतां!'

क्षणभर त्यांचें जेवण म्हणजे एकप्रकारची ब्यादच वाटली मला.

माझं मलाच हंसू आलें!

ज्या ज्या वेळीं ते इकडे जेवत तेव्हां केवढ्यातरी तत्परतेनें मी त्यांची व्यवस्था करीत असे. आज नुसत्या तत्परतेनेंच नव्हे तर मोठ्या आनंदानें मी त्यांना जेवायला वाढायला हवं होतं! पण आज त्यांनीं सगळी इस्टेट सुरेंद्राच्या नांवची करायची ठरविल्यामुळें, ती बातमी सुरेंद्राला कळविण्यासाठीं माझा जीव अगदीं अधीर झाला होता. म्हणून झटकन् त्यांना चहा द्यावा आणि पत्र लिहायला बसावं म्हणून मी निघालें होतें. पण त्यांनीं जेवण म्हणतांच मला वाटलं, आतां पत्र लिहायला उशीर होणार! ज्यांनीं सगळी इस्टेट देण्याचें ठरविलें, त्यांच्यापेक्षां सुरेंद्राला पत्र लिहिणं कांहीं अधिक नव्हतं. पण त्याक्षणीं माझ्या अधीर मनाला तसं वाटलं नाहीं. आणि तसं न वाटणाऱ्या त्या वृत्तीचंच मला हंसू आलं! उभ्या जन्मांत कधीं त्यांच्या जेवणाची मला ब्याद वाटली नाहीं. पण आज? हर्षानं माणसं वेडी होतात हेंच खरं!

त्यांना जेवायला वाढल्याशिवाय पत्रच लिहायचं नाहीं, असा मी निश्चय केला. आणि त्यांचं जेवण आटपलं तेव्हांच मी पत्र लिहायला बसलें. प्रथम मी त्याला सविस्तर सगळी हकिकत कळविली, अन् पुढं लिहिणार, तोंच गच्चींतील पोपट 'सू सू' असा आवाज करीत आणि पायांतले घुंगूर वाजवीत सारखा नाचूं लागला. मला वाटलं, तो सुरेंद्राला बोलवा असंच म्हणतोय! मी पुढं लिहिलं, 'पत्र पोंचतांच तावडतोब निघून ये. तुझी कोणतीही सबब ऐकायला मी तयार नाहीं.

‘ तुला कळूं लागल्यापासून तूं माझ्यापासून दूरदूर राहाण्याचा प्रयत्न केलास. अन् कोल्हापुरला गेल्यापासून तर काय, सुट्टींत देखील तुझं दर्शन मला होईनासं झालं! अभ्यास फार असतो, गायनमास्तर सोडीत नाहींत, अन् प्रोफेसरांच्या सहवासांत राहिल्यानें पुष्कळच फायदा होतो, असं सांगून तूं माझ्यापासून दूर राहिलास. पण आतां मात्र तुला कोणतीच सबब सांगतां येणार नाहीं. तुझ्या आयुष्याचा अमोल क्षण उगवला आहे. ज्या मातेनं तुला कलंकित जन्म दिला तिच्याच हातून तुझा कलंक धुतला जाणार आहे! तूं बोरगांवचा जमीनदार झाल्यावर तुला कलंकित म्हणायची कोणाची छाती होईल? आतांतरी या दुर्दैवी मातेचा तिरस्कार करणार नाहींस ना? धांवत धांवत ये. तुझी वाट पाहणारी

तुझी
आई. ’

असं पत्र त्याला काल मिळालं असेल. तें पाहून तो ताबडतोब निघेल असं मला वाटलं होतं. म्हणून मी काल संध्याकाळपर्यंत त्याची वाट पाहिली. पण तो आला नाहीं. आज मात्र एकच्या गाडीनें तो खास येणार, अशा आशेनें एक केव्हां वाजेल असं मला झालं होतं!

पण साडेआठ वाजतांच पोस्टमन एक पत्र टाकून गेला. तें सुरेंद्राचंच होतं. मी तें फोडलं अन् वाचूं लागलें,

‘ आई,

तुझं पत्र वाचून मला हर्ष होण्याऐवजीं हंसू आलं. अन् मी मनांत म्हटलं, ‘ जगांतल्या सगळ्या आया वेड्या असतात हेंच खरं! तूं तरी त्याला अपवाद कशी! ’ माझ्या आयुष्यांतला अमोल क्षण

उगवला म्हणून तूं मला धांवत धांवत यायला सांगितलंस. माझ्या-ठिकाणीं दुसरा कुणि असता, तर तो तुझ्याकडं विमानानंच धांवत आला असतां. पण मी येऊं शकत नाहीं. ज्या चिखलांत माझा जन्म झाला त्याच चिखलांत लोळायची माझी इच्छा नाहीं. त्यांतून मला वर निघायचंय !

आणि अमोल क्षण आयुष्यांत एकदांच उगवतो. माझ्या आयुष्यांत तो पूर्वींच उगवलाय. कोणता सागूं ? माझ्या जन्माचा ! अमोल क्षणाचं आयुष्यांत कधीं विस्मरण होत नाहीं. मला तरी माझ्या जन्माचं कुठं विस्मरण होतंय !

माझ्या अशा लिहिण्यानं तुला दुःख होईल, हें मला कळतं. माझ्या वागण्यानं मी तुझा तिरस्कार केला, असं तुला वाटतं, तेंही खरं असेल. पण अधिक विचार करूं लागलों, कीं मला वाटतं, मी तुझा तिरस्कार करीत नाहीं, बापूंचा तिरस्कार करीत नाहीं, आणि समाजाचाही नाहीं. मला माझ्या दुर्दैवाचाच तिरस्कार वाटतोय ! ज्या परिस्थितींत माझा जन्म झाला, त्यांत तुमचा कुणाचाच दोष नाहीं. तो सगळा दोष माझ्या दुर्दैवाचा आहे.

परवां इथल्या एका समारंभांत माझं गायन झालं. उत्तम-तऱ्हेनं गायलों मी. माझी स्तुतिही खूप झाली. पण त्या स्तुति-बरोबरच कडूजहर शब्दांचा मारा सहन करावा लागला ! गायन संपवून मी बैठकींतून बाहेर पडलों, तेव्हां मागं कुणी तरी म्हणालं, ‘ करीमखांचं गाणं ऐकल्यासारखं झालं बुवा आपणांला ! एवढ्या अल्पवयांत त्यांनीं चांगलंच प्राविण्य मिळविलंय हं संगीतांत ! ’ दुसरं कुणितरी म्हणालं, ‘ अहो, मिळवणारच. असल्या मुलांना जन्मजातच वळण असतं ! ’

' असल्या म्हणजे—?'

' रखेलीचा मुलगा आहे हा!'

आंत जाऊन खाडकन् त्या माणसाच्या मुस्कटांत द्यावी, असं मला वाटलं. पण मी तसं करूं शकलों नाहीं. तो इसम कांहीं खोटं बोलला नव्हता!

अशा कांहीं गोष्टी झाल्या, कीं माझं अंतःकरण तिळतिळ तुटतं. मला जी आशा वाटत असे, कीं एकादी कला आपण हस्तगत केली, तर त्या कलेच्या प्रभावानं आपल्या जन्माचा कलंक कुणाच्या लक्षांतही यायचा नाहीं! ती आशा समूळ नष्ट होते, अन् माझ्या जीवनाचीच मला चीड येते!

तूं म्हणशील, ' जगाला आवडणाऱ्या कमळांचा जन्म चिखलांतच होतो!'

पण ज्या चिखलांत त्यांचा जन्म होतो, तो चिखल पाण्याखालीं दडलेला असतो. निवळशंख पाण्यावर तीं डुलत असतात म्हणूनच जग त्यांना डोक्यावर घेतं. तळाचा तो सगळा चिखल वर आला, अन् त्या चिखलानं लडबडलेलीं कमळं जगाच्या दृष्टिला पडलीं, तर जग खात्रीनं त्यांना नाक मुरडल्यावांचून राहायचं नाहीं!

जगाच्या नाक मुरडण्याला भिऊन मी जिवाचं कांहीं तरी बरं वाईट करीन, असं तूं समजूं नकोस! माझ्यापुढं सूर्याचा आदर्श आहे. चंद्रावर जसे कलंक आहेत, तसेच सूर्यावरही आहेत. पण ' कलंकित चंद्र ' म्हणून चंद्राची हेटाळणी करणाऱ्या जगाला सूर्याचे कलंक कधीं दिसले आहेत कां? कसे दिसणार? त्याचा प्रकाशच इतका तेजस्वी अन् प्रखर आहे, कीं त्यानंच जगाचें डोळे दिपून जातात! डोळे दिपवणारा प्रकाश, डोळे दिपवणारं

कर्तृत्व असलं; म्हणजेच कलंक झांकले जातात! संपत्तिच्या धुरानं कधींही नाहीं!

आई, मी सूर्य व्हायचं ठरविलंय! आपला मुलगा सूर्यासारखा तेजस्वी झाला तर तुला अभिमानच वाटेल ना? मग मला त्या संपत्तिच्या मोहांत पाडू नकोस. तूं म्हणशील, 'हा सूर्य कसा होणार?' कसा सांगू कां? अगदीं भगवानदादासारखा! मुंबईच्या मजुरांसाठीं तो लढला. सगळ्या वर्तमानपत्रांत त्याचे फोटो नि भाषणं झळकतायत. त्याचें कर्तृत्व सूर्यासारखेंच नाहीं कां? त्यालाच मी माझा आदर्श समजतो!

आई, आजपर्यंत मी तुझ्या इच्छेप्रमाणें कधीं वागलों नाहीं. पण पुढंतरी मी तसं वागावं, असं तुला वाटत असेल, तर माझ्याकरितां तूं एक गोष्ट कर. दादाविषयीं मन कलुषित होऊन, किंवा तुझ्या सांगण्यावरून, कसेही असो, सगळी इस्टेट माझ्या नांवची करायला बापू तयार झाले असले; तरी त्यांना तसं करूं देऊं नकोस! सगळ्या जगानं मला कलंकित ठरविलं, तरी दादा माझा आहे. अन् मी दादाचा आहे! हें वाचून तूं माझी वेड्यांतच गणना करशील. मी वेडा असतो तर किति चांगलं झालं असतं!

तुझ्या पत्राप्रमाणें मी आलों नाहीं, म्हणून राग मानूं नकोस. बाकी आईला आपल्या मुलाचा राग कधींच येत नाहीं. आणि मुलालाही आपल्या आईचा तिरस्कार वाटत नाहीं. मी तुझा तिरस्कार कधीं केला नाहीं, अन् पुढेंही करणार नाहीं. ती. बापूंना नमस्कार सांग.

तुझा
सुरेंद्र'

पत्र वाचून मी खालीं ठेवलं. तेव्हां मला कैकयीची अन् भरताची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. बिचाऱ्या कैकयीनं रामाला वनवासाला पाठवून भरतासाठीं राज्य मिळवलं. पण त्या भरताला काय त्याचें ? तें राज्य लाथाडून तो रामामागंच धांवत सुटला. आजपर्यंत ज्या भगवानचा मी द्वेष करीत आले, त्याला सुरेंद्रानं 'माझा दादा' म्हणावं ! याबद्दल मला कसेसेंच वाटूं लागलें!

सुरेंद्राला कांहीं कळत नाहीं, हेंच खरें. त्याचं हित कशांत आहे, हें त्याच्यापेक्षां मलाच जास्ती कळतें. स्वतःचा मुलगा मारायला उठला तरी, त्याच्या हितासाठीं म्हणूनच कैकयीनें आपला हट्ट शेवटपर्यंत सोडला नाहीं. मीही तेंच करायचें ठरविलें.

  

ते बाहेरून आले. तेव्हां त्यांच्यापुढं मी तें पत्र टाकलें. त्यांनीं विचारलं, 'सुरेंद्राचं दिसतंय. काय म्हणतेय स्वारी ?'

'वेड लागलंय त्याला !'

'लागणारच ! सगळी इस्टेट मिळणं म्हणजे कांहीं लहानसहान गोष्ट नाहीं !'

'अहो, त्याला इस्टेटीचं वेड लागलं नाहीं.'

'तर—?'

'ती नको म्हणण्याचं !'

'असं कां?' ते पत्र वाचूं लागले.

रेशीमकाठी उपरणें त्यांनीं गळ्याभोंवतीं गुंडाळलेलं तसंच होतं. डोकीचा रुमाल त्यांनीं तिथंच बाजूला काढून ठेवला होता. सका-

ळच्या कोंवळ्या उन्हानं त्यांचं सगळं डोकं घामानं थबथबलं होतं. अन् त्यांतलेच एक दोन थेंब कपाळावर ओघळत होते. तसंच डाव्या कानशिलाजवळचा तो वण पाहून मला एकदम, वाड्यांत शिरलेल्या चार चोरांना त्यांनीं मारलेल्या वेळची आठवण झाली. आणि त्यांच्या त्या सशक्त गोऱ्यापान शरीराचा मला अभिमान वाटला.

पत्राचा सुरवातीचा भाग वाचतांच त्यांच्या उतरत्या कपाळावर आठ्या पडलेल्या मला स्पष्ट दिसल्या. आणि त्या आठ्यांतून घामाचं पाणी पसरलं ते पाहून मला गंमत वाटली!

पत्र वाचून त्यांनीं खालीं ठेवलं. अन् अशा कांहीं दृष्टीने माझ्याकडे पाहिलें, कीं त्या दृष्टींत एकप्रकारची व्याकुळता होती, एकप्रकारचा उदासीनपणा होता. काय बोलावें ते मला कळेना.

तेच म्हणाले, ‘ कशीं आहेत मुलं, भगवानची ती तऱ्हा, तर सुरेंद्राची ही ! ’

मला वाटलं, स्वतःची मुलं सुख तर नाहींच, दुःखच देऊं लागलीं तर कुणाला तीं तऱ्हेवाईक वाटणार नाहींत ? आज सुरेंद्र आला असता, तर त्यांना केवढा आनंद झाला असता ! पण तो आला नाहींच. उलट त्यांना वाईट वाटेल असंच त्यानं पत्र लिहिलं. उभी हयात ज्यांनीं इस्टेट वाढविण्यांत घालविली, त्यांना त्यांच्याच मुलानं इस्टेटीला ‘ चिखल ’ म्हटलेलं कसं आवडेल ? एका मुलानं इस्टेटीला चिखल म्हणून लाथाडायचं, अन् दुसऱ्यानं तर शेतकरी मजुरांच्या हिताशिवाय दुसरी भाषाच बोलायची नाहीं, अशा स्थितींत त्यांच्या मनाला काय वाटत असेल त्याची कल्पनाच करतां यायची नाहीं !

सुरेंद्राला इस्टेट मिळण्याची हीच संधि होती. म्हणून मी त्यांना विचारलं, ‘ मग काय करायचं आतां ? ’

‘ काय वाटेल तें कर. भगवान मुंबईहून यायच्या आंत सुरेंद्र इथं यायला हवा ! ’

‘ तें माझ्याकडे लागलं. ’ म्हणून मी त्यांना सांगितलें.

सुरेंद्राला आणण्यासाठीं माणूस पाठवावा असं मला वाटलं. पण माणूस पाठवला तर हट्टाला पेटून तो मुळींच यायचा नाहीं, म्हणून तात्बडतोब येण्याबद्दल मी त्याला तार केली !

---

## बापूसाहेब

: ७ :

सुरेंद्राचं पत्र वाचून मला जितकं वाईट वाटलं होतं, त्याच्या-पेक्षांही जास्त, तार पोचल्याबरोबर तो आला, म्हणून मला आनंद झाला. आपल्या मनाप्रमाणें आपला एकतरी मुलगा वागतोय यांत केवढं तरी समाधान आहे ! रात्रीं आम्हीं बरोबरच जेवलों. अन् जेवणानंतर चांगल्या अकरा वाजेपर्यंत गप्पा मारीत बसलों होतों. किति मोकळ्या मनानं बोलत होता. आपल्या एका चोचऱ्या प्रोफेसराची त्यानं जी नक्कल करून दाखविली, ती ऐकून तर हंसतां हंसतां पुरेवाट झाली माझी ! नाहीं तर भगवान ! एकदांसुद्धां असं माझ्याशीं तो कधीं बोलला नाहीं. आपल्या आईजवळ मात्र घोड्यासारखा खेंकळत असतो. पण मी तरी त्याला असा कधीं जवळ घेतलाय म्हणा !

सकाळीं मी उठलों, तेव्हां सुरेंद्राच्या खोलीत जाऊन त्याला उठवावं असा विचार माझ्या मनांत आला. पण म्हटलं, रात्रीं बराच

वेळ जागलाय, झोंपेना आणखी तासभर ! म्हणून मी बाहेर गेलों. आणि परत येऊन पाहतों तों काय, स्वारी माझ्याही अगोदर उठून नदीवरून आंघोळ करून आलेली !

तारानें चहा तयार झाल्याचें सांगितलें. आम्हीं स्वयंपाकघरांत जाऊन पाटावर बसलों. तिनें दोघांच्या पुढें दोन शिऱ्याच्या बशा ठेवल्या. शिरा खातां खातां मी त्याला म्हटलें, 'आतां फिरायला येतोस कां माझ्याबरोबर ?'

'हो हो, येतो कीं—' हंसत त्यानें उत्तर दिलें.

चहा घेतल्यावर आम्ही वर दिवाणखान्यांत आलों. मी पानाचा डबा घेऊन पान खाऊं लागलों. अन् तो वर्तमानपत्र चाळूं लागला. सुपारी कातरतां कातरतां मी त्याला विचारलें,

'आज कांहीं विशेष ?'

'ताजं अजून आलं नाहीं. हें कालचंच दिसतंय !'

'कालचं तरी मी कुठं पाहिलंय. अन् जें पाहिलं नाहीं तें ताजंच म्हणायचं ! ही लढाई सुरू झाल्यापासून वर्तमानपत्र वाचायची पुष्कळ इच्छा होते. पण सवडच मिळत नाहीं बघ.'

'तसं कांहीं विशेष नाहीं. फक्त एकच गोष्ट विशेष दिसतेय.'

'कोणती ?'

'मुंबईचा मजुरांचा संप यशस्वी झालाय !'

मला नको होती तीच गोष्ट त्यानें सांगितली.

'सुपारी घे कीं तुला.' असं म्हणत मी तो विषय तिथंच सोडला—

सुपारी घेण्यासाठीं तो माझ्यासमोर येऊन बसला. त्यानें सुपारी खाल्ली. मग मी म्हटलें, 'पान घे ना.'

तो म्हणाला, 'नको.'

‘ कां ? घे ना ! ’

आग्रहानेंच मी त्याला पान खायला लावलें. त्यानें पान खाल्लें, तेव्हां मला वाटलें, लहानसहान गोष्टींत देखील सुरेंद्र माझं ऐकतोय ! पानानें त्याचे ओठ लाललाल झाले, तेव्हां त्याचा चेहरा किति सुंदर दिसत होता. त्याचें तें सरळ नाक, फार उंच नाहीं अन् अगदीं अरुंदही नाहीं असें कपाळ आणि त्यावर रुळणारे काळ्या भोर केसांचे झुपके किति मोहक दिसत होते. त्याच्या त्या गौर-वर्णाला शोभणारे रेशमी कपडे त्यानें वापरले असते तर मला वाटतं, भगवानपेक्षांही तो अधिक चांगला दिसला असता ! पण त्याचा तो खादीचा शर्ट अन् तसलीच विजार मला कांहीं आवडली नाहीं. म्हणून मी त्याला म्हटलें,

‘ ही भिकार खादी कशी काय आवडते तुला कुणास ठाऊक ! मला तर या खादीकडं बघायचीसुद्धां इच्छा होत नाहीं. अन् लहानपणीं तर रेशमी शर्टाशिवाय नि सर्जेच्या कोटाशिवाय मी शाळेंत पाऊलच ठेवलं नाहीं कधीं. नाहीं तर तुमचे हे छंद ! गांधी–टोपी काय घालतां, खादीचे शर्ट काय वापरतां, आणि विजारी-देखील तसल्याच ! तुमचं हें वेड बघून मला तर गंमतच वाटते ! ’

माझं तें बोलणं त्याला आवडलेलं दिसलं नाहीं. त्याच्या कपाळावर सूक्ष्म आठ्या पडल्याचा मला भास झाला. कांहींतरी बोलण्यासाठीं त्याचे ओठही स्फुरण पावले. पण मोठ्या संयमानेंच त्यानें खालच्या ओठाची डावी बाजू दाताखालीं दाबून त्यांना आवरलें असावें. तो फक्त एवढेंच म्हणाला,

‘ खादी वापरणं हें वेड नाहीं, बापू. तो एक देशाभिमान

आहे ! आपल्या देशांत होणारंच कापड वापरण्यांत केवढातरी आनंद आहे.’

त्यावर मीही अधिक बोललों नाहीं. मी ‘ फिरायला चल ’ म्हणतांच त्यानें आपली नेहमींची गांधी–टोपी घातली, कोट चढवला, अन् मजबरोबर तो बाहेर पडला.

गांवांतून बाहेर पडायला मारुतीच्या देवळापुढून रस्ता होता. पण नदीचें पाणी नुकतेंच चढून उतरल्यामुळें त्या रस्त्यावर सगळीकडे गाळ नि कांटे पडले होते. म्हणून गांवाच्या पूर्वबाजूनें जो रस्ता दक्षिणेकडे एक मैलावर असलेल्या अंबाबाईच्या देवळाकडे जातो त्या रस्त्याकडे आम्हीं निघालों. या खालच्या वाड्यांतून बाहेर पडल्यावर पूर्वेकडच्या रस्त्याकडे जातांना वाटेंतच गांवंदरीचा वाडा लागतो. तिथं गवंडी, सुतार आणि मजूर यांचें जें काम चाललें होतें तें अन् वाड्याची बंगलेवजा आंखणी मी त्याला दाखविली. मारुति सुतारानें आणखी एक महिन्यांत काम पूर्ण होईल असें सांगितलें.

तिथून आम्ही दक्षिणेकडे वळणाऱ्या रस्त्यावर आलों. पूर्वेच्या बाजूला आश्रम नि शाळा जवळ जवळच होती. त्या दोहोंच्यामधल्या पटांगणांत डॉक्टर मुलांची लाठी घेत होते, ती दिसली. सुरेंद्रानें तिकडे जाण्याची इच्छा दर्शविली. पण सूर्य बराच वर आला होता. तिकडे गेलों तर अधिक उशीर होईल, म्हणून आम्हीं रस्त्याला लागलों.

अजून मृगाला सुरवात झाली नसल्यामुळें डाव्या बाजूच्या सगळ्या काळ्या जमिनी मोकळ्याच पडल्या होत्या. त्या कांहीं नांगरलेल्या, कुळवलेल्या तर कांहीं सड वेंचलेल्या, कांहीं सडसुद्धां

न वेंचलेल्या दिसत होत्या. एक उन्हाळ पाऊस झाला असल्यामुळें सगळी जमीन मोकार दिसत होती. आणि तिच्यावर ठिकठिकाणीं खेळत असलेली हिरवळ पाहून बरें वाटत होतें. उजव्या बाजूचा देखावा तर फारच रम्य दिसत होता. मळीची तांबडी भडक जमीन, तींत फोंफावून वाढणारीं गवतं नि शेवऱ्या हिरव्याचार दिसत होत्या. त्या पलीकडे वाहणाऱ्या नदीच्या पाण्याचा तो तांबूस तांबूस रंग किति बहारीचा वाटला ! नदीच्या राड पाण्यांत न्हाल्या-मुळें मळींतल्या सगळ्या झाडांच्या पानांवर तांबड्या मातीचे कण चिकटले होते. अन् ठिकठिकाणच्या खोलवट्यांत पाणी तसंच सांचून राहिलं होतं, तें सूर्याच्या कोवळ्या किरणांत चमकत होतं. रस्त्यावर दुतर्फा लिंबाची अन् करंजीचीं झाडें वाढलीं होतीं. आणि करंजीच्या पांढऱ्या शुभ्र फुलांचा तर रस्त्यावर सडाच पडला होता. त्या फुलांचा नि निरनिराळ्या वनस्पतींचा किंचित उग्र पण शीतळ गंध मनाला मोहिनी घालीत होता.

या एकंदर देखाव्यानं सुरेंद्राच्या चेहऱ्यावर कितितरी प्रसन्नता दिसत होती. पण तो बोलत मात्र नव्हता फारसं ! तेव्हां मीच त्याला म्हटलं, ‘ पाहिलंस वाड्याचं काम ?’

‘ हं— ’

‘ मग कसं काय, अगदीं बंगलेवजा होईल कीं नाहीं आतां ?’

‘ हो न व्हायला काय झालं ! ’

‘ आपला एक वाडा अगदीं बंगल्यासारखा असावा अशी माझी फार इच्छा होती. कारण आपल्याकडे बडेबडे पाहुणे यायचे. कधीं कधीं सरकारी अधिकारी उतरायचे ! त्यांना या जुन्या पद्धतिच्या वाड्यांत कोंडतांना मला लाज वाटायची. त्या दृष्टीनें विचार केला,

कीं मला वाटतं हा वाडा पुन्हां बांधण्याची संधि मिळाली हें बरेंच झालें! आतां अगदीं मनासारखी रचना करतां येईल!'

'मग त्या आगलाव्याचे आभार मानायचे, कीं त्याला तुरुंगांत डांबायचा!'

'आगलाव्याचेच काय, त्यावेळीं त्या वाड्यांत असलेल्या सगळ्या शेतकऱ्यांचे मी आभारच मानतोंय कीं— ! पण ते जरा निराळ्या पद्धतिनें!'

'म्हणजे?'

'तिथं काम करणारे ते मजूर होते ना, ते सगळे फुकट राबणारे आहेत.'

'मला नाहीं कळला, तुमच्या बोलण्याचा अर्थ.'

'वाड्याला आग लागल्यावर ते सगळे शेतकरी आश्रमांत राहायला गेले. आश्रम तरी माझ्याच मालकीचा नाहींका? तिथून त्यांना हाकलायलाहि मी कमी केलं नसतं. पण म्हटलं, राहूं देत. माझ्या मनाप्रमाणं ते थोडं तरी वागतील. पण त्याची त्यांना जाणीव नाहीं हेंच खरं! हंबीरच्या खटल्यांत मी त्यांच्या किति विनवण्या केल्या. पण एकानं कांहीं माझ्यासारखी साक्ष दिली नाहीं. त्यावेळीं फार राग आला मला त्यांचा. आणि मी त्यांना सांगितलं, आश्रमांतून तुम्हाला बाहेर व्हायला पाहिजे. अन् यंदा तुम्हाला आमच्या जमिनीही मिळणार नाहींत. तेव्हां ते फारच गयावया करूं लागले. त्यावेळीं ठरलें, कीं त्यांच्यामुळें ज्या वाड्याला आग लागली होती, त्या वाड्याच्या कामावर काम संपेपर्यंत त्यांनीं पाळीपाळीनें फुकट राबायचं! अन् मग मी त्यांना

आश्रमांत राहूं द्यायचं व लागवडीला जमिनीही द्यायच्या. असं केल्याशिवाय हे लोक वठणीवर येत नाहींत ! '

' पण तुमचा शब्द देवासारखा मानणारे हे लोक इतके कसे बिथरले, याचेंच मला नवल वाटतें ! '

' तो दोष त्यांचा नाहीं. त्याला सर्वस्वी कारण भगवान आहे ! '

भगवानचें नांव निघाल्याबरोबर तो स्वतःशींच बोलल्यासारखा म्हणाला, ' मुंबईचा संप तर थंडगार झालाय. पण दादा कांहीं आला नाहीं अजून ! '

त्यावर मी कांहीं बोललों नाहीं.

अंबाबाईच्या दगडी देवळाच्या गाभाऱ्यांत आम्हीं शिरलों. तेव्हां तिथल्या धुपाचा नि तेलाचा असा कांहीं कुबट नि तेलकट वास आला, कीं तो सुरेंद्राला सहन झाला नसावा. मी अंबाबाईला वाहिलेला सोन्याचा मुगूट अन् भरजरी पोषाक गुरवानें त्याला दाखविला. पण त्यांकडे त्याचें लक्षच नव्हतें. आणि माझें दर्शन वगैरे आटोपायच्या आंतच तो दरवाजाबाहेर येऊन उभा राहिला होता.

  

घरीं आलों त्यावेळीं नऊ वाजून गेले होते. दिवाणखान्यांत येऊन सुरेंद्रानें कोट टोपी काढली नाहीं, तोंच भगवान आल्याची बातमी तारेनें सांगितली. त्याबरोबर कोटाची अर्धवट काढलेली एक बाही, त्यानें पुन्हां बरोबर बसविली. अन् टोपीही डोकीला घातली. तेव्हां मी विचारलं, ' कुठं ? '

केवढ्यातरी आतुरतेनें तो म्हणाला, ' दादाकडे ! '

‘ अहं. जाऊं नकोस. ’

‘ बापू ! ’

एकच शब्द उच्चारून त्यानें माझ्याकडे जी नजर टाकली, त्या नजरेंत कितितरी प्रश्न सामावल्याचा मला भास झाला. ‘ कां जाऊं नये ? दादा तुमचा मुलगा नि माझा भाऊ आहे ना ? भावाला भेटायला जाणें चूक कीं काय ?’

मी म्हटलें, ‘ भगवान आपला कुणि नाहीं ! ’

‘ असं कसं ? तो माझा आहे, तुमचा आहे, आईचा आहे, सगळ्या जगाचा आहे ! ’

असं म्हणून त्यानें बाजूच्या कोनाड्यांतले एक वर्तमानपत्र उचललें. अन् त्यांतला भगवानचा फोटो दाखवित तो म्हणाला,

‘ हें कधिं पाहिलंत, कधिं आपलेपणानं वाचलंत ? सगळं जग दादाचं अभिनंदन करतंय ! मुंबईच्या सभेंत त्याच्या गळ्यांत पंचवीस हार पडले ! मजुरांना व शेतकऱ्यांना तर तो देवासारखा वाटतोय ! पण तुम्ही मात्र—’

भगवान आलाय, म्हटल्याबरोबर त्याला एवढं कुठलं अवसान चढलं कुणास ठाऊक ! फाड फाड बोलूं लागला तो. त्याला काय उत्तर द्यावें तेंही मला कळेना. जायला तर तो अगदीं अधीर झाला होता. ‘ मी येतों हं लगेच. ’ म्हणून तो जिना देखील उतरूं लागला. मी त्याला थांबविला अन् म्हटलें,

‘ जेवण करूंया आपण. आणि मग जाऊं कीं दोघेही तिकडे. कदाचित् भगवानच येईल इकडे ! ’

‘ तुम्हीं येणार ना ? ’

‘ हो. ’

'मग चला कीं आतांच. असा किति वेळ लागणार आहे वरच्या वाड्यांत जायला? तुम्ही आलांत तर दादाला केवढातरी आनंद होईल!'

आपल्या भावाच्या आनंदासाठीं, चाललेली त्याची धडपड बघून, मला रामलक्ष्मणाची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. रामासाठीं लक्ष्मणानें केवढा त्याग केला! सुरेंद्र अगदीं लक्ष्मणासारखा आहे. पण भगवान—त्याला राम म्हणायची कांहीं मला इच्छा होईना!

बाकी त्याला रामच म्हणायला पाहिजे. जगाचं कल्याण करणारा राम जेव्हां कैकेयीच्या इच्छेवरून वनवासाला निघाला, तेव्हां त्याच्या आईनं किति विनवण्या नि आक्रोश केला. अन् बाप तर त्याच्या वियोगानं मूर्च्छीतच पडला नि अखेर मेला. पण राम कांहीं परत फिरला नाहीं! भगवान अगदीं तस्सा आहे!

असल्या मुलाला भेटायला जाणं माझ्या अगदीं जिवावर आलं. पण भगवानची आई म्हणत होती, त्याप्रमाणें त्याला एकदां दोन गोष्टी सांगण्यासाठीं जावंसंही वाटूं लागलं!

म्हणून मी सुरेंद्राबरोबर निघालों.

भगवानला पाहिल्यारोबर सुरेंद्रानं त्याला घट्ट मिठी मारली. त्या मिठींत केवढं प्रेम होतं! क्षणभर मी खुळ्यासारखा पाहातच राहिलों. दोघांचे चेहरे अगदीं फुलासारखे फुलले होते. गौरवर्णामुळें सुरेंद्राचा चेहरा मोगऱ्याच्या फुलासारखा भासला, तर थोड्याशा सांवळ्या वर्णामुळें भगवानचा चेहरा बघून मला गुलाबाच्या फुलाची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. मोगरा नि गुलाब यांत गुलाबाचं आकर्षण कुणालाही अधिक होईल! मग-

वानचें उंच कपाळ, सरळ नाक, त्या नाकाच्या अगदीं शेंड्या-जवळ, तो लहानपणीं ताटांत पडून वाटीच्या कांठामुळें झालेल्या जखमेच्या वणाचा तो लहानसा कच आणि पाणीदार मोठे डोळे, केवढं आकर्षण होतं त्याच्या चेहऱ्यांत! लहानपणीं त्याच्या त्या डोळ्याचे अन् कपाळाचेच मी अधिक मुके घेत असे!

सुरेंद्रानें त्याची मिठी सोडली; आणि दोन्हीं हात हातांत धरून ते गदगदा हालवीत तो इंग्रजींत म्हणाला,

'मी तुझं अभिनंदन करतों!'

मग मी त्याला विचारलें, 'केव्हां आलास?'

'रात्रीं.'

'अगोदर तसं कळवूं नयेस कां? मी मोटार नसती कां स्टेशन-वर पाठवली?'

'पण मोटार आली होती कीं—'

'कुणी पाठवली?'

'दिवाणजींनी. मी तार केली, अन् मगच गाडींत बसलों.'

तूं गेल्यावर, इथं घडलेली सगळी हकिकत तुला कळली असेलच.'

'कळली कीं—'

'तुझ्यामुळं झालं हें सगळं!'

'माझ्यामुळं? तें कसं काय?'

तूच सगळ्या शेतकऱ्यांना शेफारून ठेवलंय्स. माझ्या शब्दाला थरथर कापणारे शेतकरी मला वाटेल तसे बोलूं लागले. माझं कांहीं ऐकेनात ते. अन् याला कारण, तुझा त्यांना मोठा आधार वाटतोय! मजुरांच्या चळवळी लढवीत तूं देशभर हिंडलास तर मला त्याबद्दल

आनंदच वाटेल! पण इथल्या शेतकऱ्यांच्या बाबतींत तूं कांहीं करतां कामा नये!'

त्यावर तो कांहींच बोलला नाहीं.

मला वाटलं, मुलगा पुष्कळच निवळलाय हं!

म्हणून मी आनंदून पुन्हां म्हटलं, 'आणखी एक गोष्ट सांगायचीय तुला.'

'ती कोणती?'

'तुझ्या लग्नाची!'

हंसतच त्यानें त्याच्याजवळ बसलेल्या सुरेंद्राच्या पाठीवर थाप मारली, अन् म्हणाला, 'अरे, माझं पुन्हां अभिनंदन केलं पाहिजेस बरं कां आतां!'

सुरेंद्र म्हणाला, 'मुळींच करणार नाहीं!'

'कां रे बाबा?'

'लग्न म्हणजे कांहीं लढाई नव्हे!'

'अरे, पण लग्न हें एक दिव्यच आहे!'

'दिव्य कसलं? तीस हजारांची लॉटरी आहे, म्हण वाटल्यास!'

त्यावर ते दोघेही खूप हंसले.

आणि त्या दोघांच्याबरोबर जेवायला बसतांना मला आनंद वाटला होता. पण जेवण संपेपर्यंत तो आनंद कांहीं टिकला नाहीं.

---

भगवान : ८ :

विषाचं अमृत होतं तें असं. बापू माझ्याशीं इतक्या चांगलें-पणानं वागतील हें मला स्वप्नांतसुद्धां खरं वाटलं नसतं !

मुंबईहून निघतांना मला राहून राहून वाटत होतं, आतां घरीं गेल्यावर आपल्यावर मोठा गहजब होणार. आणि कदाचित आंत जाण्यासाठीं दरवाजांत टाकलेलं पहिलं पाऊल, मला तसंच बाहेर जाण्यासाठीं परत फिरवावं लागणार ! पण इथं आलों तों बापू घरांतच नव्हते !

आईनं मात्र डोळ्यांत पाणी आणून सांगितलं, कीं 'ते तुझ्यावर फार खवळलेत, ते इथं असते तर तुला घरांत येतांच आलं नसतं. तुला घरांत घेणार नव्हते ते. अन् माझ्याशींही भांडून ते खालच्या वाड्यांत गेलेत, ते या आठवड्यांत इकडे फिरकले देखील नाहींत. त्यांनीं सुरेंद्राला बोलावून घेतलाय नि सगळी इस्टेट त्याच्या नांवची करण्याचा त्यांचा बेत आहे ! '

मग तर मला नक्कीच वाटलं, आजची रात्रच मला वाड्यांत राहातां येणार. मी आल्याचं कळतांच उद्यां सकाळीं बापू इथं येतील अन् मला बाहेर काढल्यावांचून कधीं राहायचे नाहींत. पण बाहेर काढणं बाजूलाच राहिलं. दोन उपदेशाच्या गोष्टी सांगण्यापेक्षां ते कांहीं बरंवाईटसुद्धां बोलले नाहींत.

पण ते इतक्या प्रेमळपणानं माझ्याशीं कां वागले, हें गेल्या दोन दिवसांत मला पुरतं कळून चुकलं!

तीनशें शेतकऱ्यांना ते पाळीपाळीनें वाड्याच्या कामावर फुकट राबवून घेत होते. त्यांची इच्छा एकच होती कीं, आपण शेतकऱ्यांना कसंही छळलं तरी त्या बाबतींत भगवाननं कांहीं बोलतां कामां नये. पण तें मला शक्य आहे कां? धडधडीत अन्याय डोळयांनीं बघून मी स्वस्थ तरी कसा बसूं? अन्यायाची चीड येणं हा माणूसधर्म आहे! बापूंनीं मला घराबाहेर काढलं, सगळी इस्टेट सुरेंद्राला दिली किंवा आणखी कांहीं केलं. तरी मला त्याची मुळींच पर्वा नाहीं. हजारों माणसांना टीचभरसुद्धां जमीन नसतांना माझ्यासारख्याला हजारों एकर जमिनीचा मालक होण्याचा हक्कच नाहीं! हें जेव्हां मला पटलं, तेव्हांच मी निश्चय केला, गरिबांचं सुख तेंच आपलं सुख! आणि गरिबांचं जीवन सुखाचं करण्यासाठीं झटतांना, वाटेल तो त्रास झाला, कष्ट पडले तरी ते सहन करण्याची मी तयारी केली. स्वत: जगण्यापेक्षां दुसऱ्याला जगविण्यांतच माणुसकी आहे! नाहींतर स्वतः जगण्याचें काय, किडामुंगी देखील जगते! तें कांहीं कुणाला शिकवावं लागत नाहीं. स्वतःचं पोट भरलेलं असलं तरी आपल्या वासराच्या पुढचें कोवळें गवत खायला गाय कधीं कमी करणार नाहीं. म्हणून कांहीं माणसं

तसंच करीत नाहींत; मुलाचं पोट भरण्यासाठीं स्वतः अर्धपोटी–उपाशी राहातात. अन् यांतच माणुसकी नाहीं कां? पण अशी माणुसकी आम्ही फक्त घरापुरतीच दाखवितों!

स्वतःच्या मुलानं एक घास कमी खाल्ल्याबरोबर तळमळणाऱ्या आईला, जगांतल्या कोट्यावधि माणसांना दिवसांतून एकवेळ देखील पोटभर अन्न मिळत नाहीं, याची दखलगिरी नसते. आमचंच पहा. काल सुरेंद्र न् मी होतों म्हणून आईनं जिलबीचा बेत केला होता. बाराही महिने कष्ट करणाऱ्या शेतकऱ्यांना जिलबीचं कधीं दर्शन तरी होत असेल कां? बिचाऱ्यांना भाजीभाकरीसुद्धां पुरती मिळत नाहीं.

पण ते सगळे उपाशी मेले, तरी बापूंना काय त्याचे? त्यांनीं भरपूर ताव मारला की त्या जिलबीवर. पण मला एक घासहि गिळला नाहीं! त्या जिलबीच्या कड्यांत मला शेतकऱ्यांचे कष्ट नि अन्नासाठीं त्यांना करावी लागणारी धडपड दिसत होती.

म्हणून मी तें जिलबीचें कडें तसेंच बाजूला सारलें. आईच्या प्रेमळ दृष्टींतून ती गोष्ट कधीं चुकेल कां? तिनें लगेंच विचारलें.

'भगवान तूं कांहीं बरोबर जेवत नाहींस हं—'

'बरोबर म्हणजे कसं?'

'तें जिलबीचं कडं बाजूला कां ठेवलंस?'

'ही जिलबी कोणी दिली आपणाला?'

'देवानं!'

'पण तो देव उपाशीच आहे!'

'कोण म्हणतं? मघांशींच मी नैवेद्य दाखविलाय.'

‘ नैवेद्यानं पोट भरत असतं, तर त्यानं चटणी भाकरी कधींच खाल्ली नसती ! ’

‘ पण चटणीभाकरी देवाला दाखवील तरी कोण ? ’

‘ कुणी दाखविली नाहीं, तरी त्याला पोटासाठीं खावीच लागते. अन् ती एकाच देवाला नाहीं, तर चांगल्या तीनशें— ’

‘ कुठं आहेत ते देव ? ’

‘ आपल्या झोपड्यांत ! ’

तें ऐकून बापू म्हणाले, ‘ देव झोंपड्यांत राहात नाहींत. देवळांत राहातात ! ’

‘ देऊळ असलं तर राहतील ! ’

‘ काय झालं त्यांचं देऊळ ? ’

‘ ते राक्षसांनीं पाडून— निखळून नेलं ! ’

‘ राक्षस कांहीं देवांना भारी नाहींत ! ’

‘ पण राक्षसासारखं दुसऱ्यांना गिळण्याचं काम, देवांना कसं साधणार ? ’

त्या संवादानं एकदम गंभीरता उत्पन्न झाली. नंतर सुरेंद्र नि बापू कोणी कांहींच बोलले नाहींत.

आईनं मला खूप आग्रह केला. पण मी त्या जिलबीला हात लावला नाहीं. माझ्या बोलण्यानं बापू बरेच रागावले असावेत. जेवणानंतर कांहीं न बोलतां ते माडीवर गेले.

मी स्वयंपाक घरांतून बाहेर पडतांना, आईनं मला हांक मारली, ‘ भगवान. ’

‘ काय आई ? ’

माझ्याजवळ येऊन ती म्हणाली, ‘ मी तुझी आई आहे ना ? ’

‘ खुळ्यासारखंच काय विचारतेस ! ’

‘ खूळ लागायची वेळ आल्यावर असंच होतं माणसाचं. सगळी परिस्थिति तुला माहीत असतांना तूं त्यांना कां दुखवितोस ? ’

‘ त्यांना सुखवणं मला शक्य नाहीं म्हणून ! ’

‘ भगवान.—’

‘ आई, बापूंच्या विरोधाचं मला कांहींच वाटत नाहीं. त्यांच्या-सारख्यानं विरोध न केला तरच नवल वाटलं असतं. पण तूंसुद्धां त्यांच्यासारखं बोलूं लागलीस, तर मला भयंकर दुःख होईल ! काय करतील बापू ? सगळी इस्टेट सुरेंद्राला देतील ना, देऊं देत. सुरेंद्र माझा भाऊच आहे ! आणि मला घराबाहेर काढतील, तर तेंही करूं देत. तूंच म्हणतेस ना, ‘ घर म्हणजेच कांहीं जग नाहीं. ’ घर घर म्हणून जर मी घराला कवटाळून बसलों, तर त्या तीनशें लोकांनीं कुणाच्या तोंडाकडे बघायचं ? त्यांना खायला अन्न नाहीं, तें मिळविण्याचं ज्ञान नाहीं अन् त्यासाठीं लढण्याचं त्राणही नाहीं ! त्यांची अशी परिस्थिति असतांना, बापूंना विरोध न करतां गादीवर लोळण्यांत ती जिलबीपुरी खाण्यांत मला कधींही सुख वाटणार नाहीं. जमिनदारीच्या जुलमानं गांजलेले शेतकरी सुखी झाल्याशिवाय माझी तळमळ थांबणं अशक्य आहे ! आई, तूं एवढंच लक्षांत ठेव कीं, आपला मुलगा गरिबांचं दुःख कमी करण्यासाठीं झटत आहे ! म्हणून मला घराबाहेर पडावं लागलं, तरी दुःख करूं नकोस. तुला कमीपणा वाटेल असं कांहीं माझ्या हातून घडायचं नाहीं. उलट तुला अभिमान वाटेल असंच माझं वागणं होईल ! ’

कशीतरी तिची समजूत करून मी बाहेर पडलों !

दुपारीं सुभद्रेबरोबर आश्रमांत जातांना मी वाड्याचं काम पाहाण्यासाठीं तिकडे गेलों. काम पाहिलं. पण त्यापेक्षांहि तिथं कामावर असलेले तीस चाळीस शेतकरी जेवणाची सुट्टी झाल्यामुळें समोरच्या लिंबाच्या झाडाखालीं जेवत बसले होते, तिकडे जाण्याची मला अनावर इच्छा झाली ! मला पाहिल्याबरोबर प्रत्येकजण म्हणाला,

‘ रावसाब जेवायला या. ’

‘ घ्या देवाचं नांव ! ’ किंवा असंच कांहींतरी त्यांना उलट म्हणायला पाहिजे होतं. पण मला त्याची आठवणच राहिली नाहीं. ते खात असलेल्या त्या वाळक्या कोरड्या भाकरी—त्या भाकरीबरोबर कांहींना कोरड्यास होतं तर कांहींजण हिरव्या मिरच्याच्या चटणीबरोबर खात होते. कित्येकांना तीही नव्हती. नुसती वाळली चटणी न् कांदा ! तें बघून मला भडभडून आलं. क्षणभर मला वाटलं, खरंच जेवायला बसावं अन् ती चटणी-भाकरी खाण्यांत काय सुख आहे तें बघावं !

पण मला एक घास तरी गिळला असता कीं नाहीं कुणास ठाऊक !

ती स्थिति बघूनही त्यांना फुकट राबविणं म्हणजे—

पण बापूंना कुठं दिसतंय हें ? शेतकऱ्यांना मी फुकट राबवितोय यांतच त्यांना मोठेपणा वाटतोय ! असला मोठेपणा म्हणजे मनाचा क्षुद्रपणाच नव्हे कां ? पण एवढं समजायला हृदय शाबूत असावं लागतं. श्रीमंतीच्या धुरानं नुसते डोळेच बिघडत नाहींत, तर हृदयसुद्धां धुरकटून जातं !

न कळत माझा हात छातीकडे गेला. माझं हृदय धुरकटलं नव्हतं. अन् म्हणूनच तें तळमळत होतं !

सुभद्रा त्यांना म्हणाली, 'रावसाबांना जेवायला बोलावताय पण तुमच्या पोटापुरती तरी आहे कां भाकरी ?'

त्यांच्यांतला एकजण म्हणाला, 'नसेना. आम्हीं थोडी कमी खाऊं !'

मी म्हटलं, 'कमी खाऊन कसं चालेल ? दिवसभर काम करायचंय तुम्हांला !'

'कामाचं काय, अजिबात न खाल्लं तरी तें केलंच पाहिजे !'

अन् तें बोलतांना त्यानं जो उदासवाणा चेहरा केला, तो मला पहावेना ! त्याची समजूत करण्याच्या हेतूनं मी म्हटलं, 'पोटासाठीं काम केलंच पाहिजे.'

'पण काम करूनही पोटाला मिळालं नाहीं तर....'

मी झटकन बोलून गेलों, 'तें मिळविलं पाहिजे !'

'कसं ?'

'लढून.'

लढून म्हटल्याबरोबर तो एकदम चमकला. अन् म्हणाला, 'लढून अन्न मिळवायला गेलों, तर अन्न मिळण्याऐवजीं आम्हालाच मरावं लागंल !'

'पण लढाईत मेलेल्या वीरांचं स्मारक होतं !

'तें करायला कुणी जिवंत राहिलं तर !'

आणि तें खरंच नव्हतं कां ? लढाईत पडलेल्या वीरांचं स्मारक करतात–पण ते जेत्या बाजूच्या वीरांचं ! जित बाजूचे वीर कांहीं कमी शौर्यानं लढलेले नसतात. पण त्यांचं स्मारक कोण करणार ?

डॉक्टरांचा तांतडीचा निरोप आल्यामुळें मी आश्रमाकडे निघालों. वाटेंत सुभद्रा म्हणली, 'पोराला जास्ती झालं वाटतं !'

‘ कुठल्या पोराला ? ’

‘ गणूचा पोरगा तापानं फणफणलाय नुसता ! ’

आम्ही तिथं गेलों तर डॉक्टर व त्या पोराची आई त्याच्या भोंवती बसली होती. अन् तो भ्रमांत सारखा बडबडत होता. मला पाहिल्याबरोबर डॉक्टर उठून बाहेर आले. अन् हळुंच म्हणाले, ‘ भगवान, हा साधा ताप नाहीं— ’

‘ तर —? ’

‘ प्लेगचा ! ’

मी एकदम चमकलों. ‘ मग ? ’

‘ याला हलवला पाहिजे इथनं. ’

पण कुठं हालवायचा तोच प्रश्न होता. आंत जाऊन मी त्या पोराच्या आंगाला हात लावला. तापानं तर हात पोळलाच माझा. आणि त्याचीं हाडं काट्याप्रमाणें माझ्या बोटांना टोंचलीं ! पोटभर खायला मिळाल्याशिवाय आंगावर मांस तरी कुठलं येणार ?

त्याची आई रडतच म्हणाली, ‘ रावसाब, तुम्हींच माझ्या पोराला वांचवा ! ’

त्या पोरानं पाणी मागितलं. पाणी देण्यापेक्षां फळाचा रस द्यावा म्हणून मी विचारलं, ‘ फळं कांहीं आणलीं नाहींत ? ’

‘ कशाचीं आणूं ? सहा आणे जवळ होते. त्यांत उसन्या दोन आण्याची भर घालून सकाळींच गड्याला दिले ! ’

‘ कुठल्या गड्याला ? ’

तिनं जें सांगितलं तें ऐकून माझा भयंकर संताप झाला ! तसंच धांवत जावं अन् बापूंना त्याचा जाब विचारावा असं वाटलं. तिच्या घरीं काम करणारा गडी नव्हता. म्हणून कांहीं तिची गडी देण्याची

पाळी चुकत नव्हती! गड्याची मजुरी देऊन तिला वाड्याच्या कामावर गडी पाठवावा लागत होता.

मी तावडतोब पैसे देऊन डझनभर संत्रीं आणविलीं. आणि त्यांचा रस काढून त्या पोराला पाजला.

संध्याकाळीं आश्रमांतल्या सगळया शेतकऱ्यांना एकत्र बोलावून मी सांगितलं, 'पंधरा दिवसांची तुमची जी मजुरी झाली असेल, ती मला सांगा. उद्यां मी ते सगळे पैसे बापूंना मागणार आहे!'

त्याला सगळ्यांनींच विरोध केला.

रावजी तर म्हणाला 'छे छे! भगवान तसं कांहीं करूं नकोस. तुझ्या या अल्लडपणाला आम्ही उत्तेजन दिलं असं जर बापूंना कळलं तर ते आम्हाला धुळीला मिळवून टाकतील! त्यांच्याशीं आम्ही विरोध करणं म्हणजे मातीच्या मडक्यानं तांब्याच्या घागरीवर आदळण्यासारखं आहे! अन् आमचा त्यांच्याशीं एका तऱ्हेचा संबंध नाहीं? कुणी गेल्या वर्षाचा खंड अजून द्यायचा आहे,कुणाच्या प्रामिसरी नोटा त्यांच्याकडे अडकलेल्या आहेत तर कुणाचे एकरा दोन एकराचे दस्त गुंतलेले आहेत! असं असतांना आम्ही विरोध करणं म्हणजे मृत्यूला आमंत्रण देण्यासारखंच आहे!'

'बाबा, मी अल्लडपणा करीत नाहीं; शेतकऱ्यांच्या जीवनाचा प्रश्न आहे हा!'

'पण तो तसा सुटणार नाहीं.'

'तर— ?'

'सलोख्यानंच सोडविला पाहिजे!'

'तुम्ही अर्धपोटीं फुकट राबणं अन् त्यांनीं तुम्हांला फुकट राबविणं हा सलोखाच वाटतं? सलोखा समानपातळींतल्या माण-

सांचा होतो. शिखरावर बसलेल्या माणसांचा अन् त्याच शिखराच्या तळाशीं धडपडणाऱ्या माणसांचा सलोखा होणं कधींहि शक्य नाहीं. खालच्यांना वर जातां येत नाहीं. अन् वरच्यांना खालीं यायची इच्छा नाहीं. मग सलोखा होणार कसा ? याला उपाय एकच आहे ! '

' कोणता ? '

' तें शिखर ढासळणं ! '

' वेडा आहेस. ' म्हणून डॉक्टरनीं माझ्या पाठीवर थाप मारली. मी वेडा कसा तें मला कळेना. डॉक्टरच पुढें म्हणाले,

' बापूसारख्या प्रचंड शक्तीशीं विरोध करणं शक्य असतं, तर मी आजपर्यंत गप्प बसलों असतों कां ? '

' जगांत अशक्य कांहींच नाहीं. '

' एक गोष्ट आहे. '

' कोणती ? '

' कृति करणें ! '

डॉक्टरांचा तो मला सरळ सरळ टोमणा होता. मी त्याचवेळीं निश्चय केला, वाटेल तें झालं तरी यांची मजुरी मिळवून द्यायचीच ! अन् मी त्यांना तसं सांगूनही टाकलं.

आज सकाळपासून मी तेवढ्यासाठींच घरांत बसलोय. पण बारा वाजून गेले तरी बापूंची गांठ पडली नाहीं. ते कुठं गेलेत हें आईलाही ठाऊक नव्हतं. तीनच्या सुमाराला मी दक्षिणेच्या खिडकींतून बाहेर पाहिलें. दूर अंतरावर पांचपन्नास लोकांचा घोळका पश्चिमेकडे जात असलेला मला दिसला. पांचसहा लोकांच्या हातांत बादल्या होत्या अन् ते कांहींतरी शिंपडीत निघाले होते.

कारण ते पुढें गेले, कीं त्यांच्यामागें पक्षांचा घोळकाच्या घोळका उडत होता. ते काय करीत होतें, मला कांहींच कळेना. चवकशी करण्यासाठीं दादूला पाठवावं म्हणून मी खालीं आलों, तर दादू त्या संबंधीच आईला कांहींतरी सांगत होता. मला पाहिल्याबरोबर तो म्हणाला, 'रावसाब, सकाळपस्नं तुम्ही आसरमांत गेला नाहींसा ?'

मीं मान हालवून म्हटलं, 'अं हं!

'गणूच्या पोराला पिलीकच झालाय कीं. त्याच्या काकंत चांगल्या दोन गाठी उठल्यात्या. ती बातमी जवा गांवांत पसारली तवा सगळीं माणसं मरिमीच्या देवळापुढं जमलीं. अन् सगळ्यांनीं हात जोडलं तवा मरीआईनं अंगांत येऊन सांगितलं, की 'योकच घास म्या घेतलाय. मी तुमच्या गांवाला धक्का लावणार नाहीं. पण तुम्ही आंबील घुगऱ्याचा निवद करून गांवाभवतं चरक शिपला पाहिजे. त्यापरमानं सगळ्या गांवातल्या आंबील घुगऱ्या जमीवल्या,— आपल्या घरच्याबी गेल्यांत की घुगऱ्या ! त्याचा मरीआईला निवद दाखविला. अन् आतां तेचाच चरक शिपायचं चाललंय बघा ! त्या चरकाच्या हादीच्या आंत आतां पिलीकाला येतांच येणार नाहीं ! '

प्लेग नाहींसा करण्याचा तो उपाय बघून लोकांच्या अज्ञानाला हंसावं कीं रडावं तेंच मला कळेना ! आज देवानं गांवाला धक्का लावीत नाहीं, म्हणून सांगितलं तरी उद्यां माणसं मरायची कांहीं थांबणार नाहींत ! अन् तसं झालं तरी यांचा देवावरचा विश्वास आपला अढळच. प्रत्येक गोष्टींत देव यांना फसवीत आलाय. पण त्याच्या त्या फसवणुकीची यांना आठवणच राहात नाहीं कधीं ! डोळे झांकून देवाकडेच धांवत असतात ते. आणि हजारों वर्षांपासून

देवावर विश्वास ठेवणारे हे लोक नुसत्या मनानंच दुबळे होत नाहींत तर शरीरानंसुद्धां ! लहानसहान आपत्ति आली तरी यांना वाटतं, ती देवानं आणली. अन् तिचं निवारणही देवच करील! द्रौपदीचा धांवा ऐकून धांवणारा देव, दामाजीचं संकट निवारणारा देव नि साधुवाण्याला पावणारा देव त्यांच्या भोळया मनापुढं उभा असतो. मग हातपाय हालवायचे कशाला ?

पण बिचाऱ्यांना हें कळत नाहीं, कीं जगांत देव असला तरी त्याला ऐकूं येत नाहीं, दिसत नाहीं अन् कांहीं समजतहि नाहीं !

स्वतःवरच्या आपत्तींचं स्वतःच निवारण केलं पाहिजे, हें जेव्हां या लोकांना कळेल तेव्हांच हे सुखी होतील !

डॉक्टरना सांगून सगळया लोकांना इनाक्युलेशन करायचं मी ठरविलं.

  

बापू आल्याचें दिसलें तेव्हां मी त्यांच्या खोलींत गेलों. ते रागारागानं दिवाणजींना विचारीत होते, ‘ आज काम बंद कां ठेवलं ? कुठं गेले आज सगळे लोक ? ’

‘ देवाला नैवेद्य करण्यांत नि चरक शिंपण्यांत सगळे लोक गुंतलेत ! ’

‘ पण असं करून कसं चालेल ? त्यांना खडसावायचं नाहीं कां तुम्हीं ? काम लवकर पुरं व्हायला पाहिजे ! ’

मी पुढं होऊन बापूंना म्हटलं, ‘ मला रुपये हवेत. ’

‘ किती ? ’

‘ पांचशें पंचवीस. ’

‘ कशाला ? ’

‘ पस्तीस मजुरांची पंधरा दिवसांची मजुरी भागवायची आहे ! ’

तें ऐकल्याबरोबर त्यांचा चेहरा रागानं लालबुंद झाला. काय बोलावं न् काय नको, अशासाठीं त्यांचे ओठ थरथरत होते जणूं.

‘ रोज रुपयाप्रमाणं मजुरी कुणीतरी दिली होती कां ? ’

‘ त्यांचं काम पाहिलं, तर ती देखील कमीच वाटेल ! ’

‘ पण ही चवकशी करायचं तुला कारणच काय ? ’

‘ अन्याय डोळ्यांनीं बघवत नाहीं ! ’

‘ अन् ते डोळेच काढून टाकल्यावर— ? ’

‘ मग टाका ना…! ’

म्हणून मी जरा पुढं सरलों. त्यांच्या चेहऱ्यावर घामाचे थेंब डंवरले होते. अन् अति रागानं त्यांचं सगळं शरीर कंपित झालं होतं. मला वाटलं ते कांहीं करणार नाहींत. पण विजेच्या वेगानं त्यांनीं हात उचलला. अन् काडकन् माझ्या डाव्या कानशिलावर……! एकच क्षण माझ्या डोळ्यापुढं काजवे चमकले. आणि ‘ हरामखोर ! आतांच्या आतां माझ्या घराबाहेर हो. ’ हे शब्द अग्निरसाप्रमाणें माझ्या कानांत घुसले ! माझे बाहु स्फुरण पावत होते. हातही उचलले जात होते. पण ते मी आवरून धरले, अन् खोलीबाहेर पडलों. स्वतःच्या खोलींत गेलों. समोरच्याच आरशांत माझं प्रतिबिंब दिसलं. माझ्या डाव्या गालावर पांचीं बोटं स्पष्ट उठलेलीं होतीं ! आंगांत कोट अडकविला न् मी जिना उतरून खालीं आलों. जिन्याच्या तोंडाशींच आई उभी होती. तिनं वरचा सगळा प्रकार ऐकलेला असावा. तिला काय बोलावें मला कळेना !

तिनं माझ्याकडे निरखून पाहिलं. तिच्या डोळ्यांत आसवं तर-

ळलीं. तिला डावा गाल दिसूं नये म्हणून मी प्रयत्न केला. पण तें तिच्या नजरेतून चुकलें नाहीं. माझ्या गालावरून हात फिरवीत म्हणाली, 'भगवान, काय हें ?'

'कांहीं नाहीं !' म्हणत मी बाहेर निघालों.

'कुठं निघालास ?'

'या घरांत राहायची माझी इच्छा नाहीं !'

'पण जाणार कुठं ?'

'जगांत. जग हें माझं घर आहे ! जगाला सुखी करणं हें माझं कर्तव्य आहे !'

'पण तें इथं राहून करतां येईल.'

'शक्य नाहीं. शिखरावर बसलेल्या माणसाला तळच्या माणसांचीं सुखदुःखं कधीचं कळायचीं नाहींत !'

मी दरवाजाबाहेर पडलों.

दरवाजांत धांवत येऊन आईनं हांक मारली, 'भगवान—'

त्या हाकेंत कारुण्य होतं. वत्सलता होती. त्या वत्सलतेसाठीं परत फिरावं असं मला वाटलं. पण तो मोह आवरून मी पुढं चालूं लागलों.

दूर अंतरावर गेलों तरी आईच्या हांकेचा पडसाद मला ऐकूं येत होता ! म्हणून मी मागें वळून पाहिलें.

माझ्यामागं दादू चालत होता !

'दादू!' एवढाच उद्गार माझ्या तोंडून निघाला. अन् मी पुढं चालूं लागलों !

---

## तारा

: ९ :

जीवन हें इंद्रधनुष्यासारखें आहे. त्याचें जे सात रंग दिसतात त्यांची शोभा तेवढी बघून घ्यावी. पण त्यांतला एक रंग कांहीं हाताला लागायचा नाहीं. त्यांचं वचन त्या रंगासारखंच ठरलं !

सुरेंद्राच्या जन्मापासून गेलीं वीस वर्षं मी त्यांच्या वचनावर विश्वास ठेवीत आलें. आणि त्या दीर्घ अनुभवानंतर मला कळून आलं, कीं दुसऱ्याच्या वचनावर विसंबून राहाणं म्हणजे निव्वळ दुबळेपणा आहे !

मी दुबळी नव्हतें !

मी दुबळी असतें तर आज बापूसाहेबांच्या या वाड्याची मालकीण कधींच झालें नसतें. मुंबईतल्या कुठल्यातरी माडीवरच्या खोलींत पान चघळींत बसावं लागलं असतं मला ! पण स्वतःच्या

प्रयत्नानं मी एकाद्या कुलीन स्त्रीसारखा संसार केला, सुख अनुभवलं नि चैन भोगली. पण एवढं केलं म्हणून माझं जीवन सफल झालं असं नाहीं. अजून मला एक महत्त्वाची गोष्ट करायची आहे. सुरेंद्राचं जीवन सुखी करणं ! अन् तेवढं केलं कीं, जगांतलं माझं कर्तव्य संपल्यासारखंच आहे.

परवां जेव्हां त्यांनीं सांगितलं, ‘ सुरेंद्राला बोलावून घे. सगळी इस्टेट मी त्याच्या नांवची करणार आहे ! ’ त्यावेळीं मला पक्की खात्री वाटली होती ! पण माणसांचीं वचनं हीं मृगजळासारखीं असतात. त्यानं सत्याचा भास झाला तरी, तो असत्याचाच पसारा असतो सारा !

सुरेंद्राला येऊन आठ दिवस होत आले. पण इतक्या दिवसांत इस्टेटीचं नांव काढलं नाहीं त्यांनीं. एवढंच नव्हे, भगवाननला ते घरांतून हाकलून काढणार होते तेंही त्यांनीं केलं नाहीं. उलट ते त्याच्याशीं गोडीगुलाबीनच वागूं लागलेत. असं जर ते करूं लागले तर सुरेंद्राला इस्टेट मिळण्याची थोडीतरी आशा आहे कां ?

पण सुरेंद्राला काय त्याचं ?

बोलून चालून खुळाच तो ! भगवान आल्यापासून त्याला त्याच्यावांचून घटकाभर चैन पडेना. सदान्कदा तो त्याच्याच मागं असतो. बंधुप्रेमाचा मोठा पुळका आलाय त्याला. पण हाच बंधु उद्यां त्याला लाथाडल्यावांचून कधीं राहायचा नाहीं ! मी न् ते आहेत म्हणून सुरेंद्राची चैन चाललीय. पण उद्यां आमच्या मागं त्याला उघड्या जगावर पडावं लागणार आहे. सगळं जग त्याला कलंकित म्हणून झिडकारील. अन् भगवान तर त्याला ओसरीला-

सुद्धां उभा राहूं देणार नाहीं. असा विचार मनांत आला कीं मला वाटतं, सुरेंद्रासाठीं जें काय करायचं तें क्षणाचाही विलंब न लावतां करावं! ते शरीरानें जरी धडधाकट असले तरी पिकलं पान कधीं गळून पडेल त्याचा नेम आहे कां ?

अन् तसं झालं तर मग.....

कांहींच करतां यायचं नाहीं. उलट ज्या नरकांतून मी बाहेर पडलें होतें, त्याच नरकाची वाट धरण्याची माझ्यावर पुन्हां पाळी येईल !

पण हें सुरेंद्राला कुठं कळतंय ?

त्याला वाटतं, जग कसं नंदनवनासारखं आहे !

पण या नंदनवनांत देव नाहींत अन् माणसंही नाहींत. सगळे राक्षसच भरलेत ! आणि या राक्षसांच्या जगांत न्यायनीति हे शब्द-कवडीमोलाचे आहेत. दुसऱ्याला मारून त्याचं रक्त पिण्याच्या राक्षसीवृत्तीवरच जिथं सगळ्या जगाचं जीवन चाललंय, तिथं सुरेंद्रासारख्या एकट्यानंच न्यायनीतीचा टाहो फोडण्यांत काय अर्थ आहे !

तो म्हणतो, सगळी इस्टेट माझ्या नांवची करणं हा अन्याय होईल अन् असा अन्याय मी कधींही होऊं देणार नाहीं !

पण त्याला एवढं कळत नाहीं, कीं सगळं जगच अन्यायावर चाललंय ! त्याचा बाप जो एवढा जमीनदार झाला तो काय न्यायानंच ? वाड्याच्या कामावर जे शेतकरी अर्धपोटीं राबतात तो न्यायच कां ? सुखाचं जीवन ज्याला हवं असेल त्यानं अन्या-याकडे डोळे झांकूनच पाहिलं पाहिजे. सुख कधीं भीक मागून मिळत नाहीं, तें कर्तबगारीनं मिळवावं लागतं. पण तें शक्य

नसल्यास तें मिळविण्याचा एकमेव मार्ग म्हणजे अन्याय! औरंगजेबानं जें राज्यपदाचं सुख मिळविलं तें न्याय अन्यायाचा जप करीत नाहीं, तर स्वतःच्या बापाला तुरुगांत टाकून! आणि स्वतःचा सख्खा भाऊसुद्धां नाहीं, अशा भगवानच्या बाबतींत अन्याय होतो म्हणून स्वतःच्या नांवची इस्टेट करून घ्यायला सुरेंद्रानं विरोध करणं म्हणजे—

पण तो दुबळा आहे हेंच खरं!

दुबळ्या मुलाचं संरक्षण आईनंच करायला नको कां?

म्हणून गेले चार दिवस मी सारखा याच गोष्टीचा विचार करतेंय! सुरेंद्राच्या नांवची इस्टेट करायला त्यांचा विरोध नसला तरी ते ताबडतोब तयार नाहींत. स्वतः सुरेंद्राचा त्याला विरोध! अन् भगवानचा विरोध नसणं ही तर अशक्य कोटींतली गोष्ट आहे! अशा स्थितींत मला काय करतां येईल, हें गेले चार दिवस सारखा विचार केला तरी कांहीं कळेना.

पण असले गहन वाटणारे प्रश्न देखील क्षुल्लक प्रसंगानं सुटतात!

जेवायची वेळ झाली होती म्हणून मी सुरेंद्राला बोलावण्यासाठीं माडीवर गेलें. तो कांहीं तरी लिहिण्यांत गुंतला होता. मी हळूंच जाऊन त्याच्या मागें उभी राहिलें. मी आल्याचें कळले नसल्यामुळें तो झरझर लिहीत होता. त्यानें लिहिलेल्या पहिल्या दोनचार ओळी चटकन् माझ्या नजरेत भरल्या,

'प्रिय बापू,

'काल तुम्ही दादाला घराबाहेर काढून मोकळे झालांत. पण सारी रात्र त्याचाच विचार करण्यांत मी तळमळत काढलीं. दादा-

सारख्या सद्गुणी मुलावर तुमचा एवढा रोष कां, तें मला कांहीं केल्या कळेना ! आज मात्र मी निश्चय केलाय, तुम्ही दादाला परत घरीं बोलावलंत तर बरं ! नाहीं तर मी त्याला बोलावीन अन् मला तुम्ही विरोध केलात तर तुमच्या घरीं राहाणं मला अशक्य होईल. मीही त्याच्याबरोबर घराबाहेर पडेन ! '

तें वाचून माझ्या मनाची अशी कांहीं विचित्र अवस्था झाली, कीं क्षणभर सगळी खोली फिरत असल्याचा मला भास झाला. सुरेंद्र लहान असतां तर त्याच्या तोंडांत देऊनच मी त्याला विचारलं असतं, हें काय करतोय्स म्हणून. पण तें आतां शक्य होतं कां !

मी त्याला विचारलें, ' सुरेंद्र, काय लिहितोय्स ? '

एकदम चमकून त्यानं माझ्याकडं पाहिलं. लिहिलेल्या नोटपेपरवर टीपकागद झांकला. अन् म्हणाला, ' कांहीं नाहीं ! '

त्याचं तें उत्तर ऐकून मला राग येण्याऐवजीं समाधान वाटलं ! निदान त्याला एवढं तरी कळतंय, कीं आपणाला जें भगवानबद्दल प्रेम वाटतंय तें आपल्या आईला पसंत नाहीं. म्हणून तें तिला कळणंही उचित नाहीं. आज ना उद्यां त्याला हेंही कळेल, कीं भगवानवर आपण जें प्रेम करतों तें कितीही लपविलं तरी आईला कळल्यावांचून राहात नाहीं. तेव्हां तिला बरं वाटण्यासाठीं आपण तें न केलेलंच बरं !

बाकी त्याला तें न कळलं तरी त्याच्या हिताचं मला जें कळतंय तें मला केलंच पाहिजे !

त्यानं तें पत्र त्यांना दिलं तर त्याचा भलताच परिणाम होईल

हें, मला ठाऊक असूनही, मी त्या वेळीं त्या पत्राबद्दल कांहींच बोललें नाहीं. मी त्याला ' जेवायला चल ' म्हटलें.

तो म्हणाला, ' मला भूकच नाहीं अजून. '

' अकरा वाजून गेले कीं... '

' भूक लागली नाहीं म्हणून घड्याळ कांहीं थांबत नाहीं! '

' पण तुझी भूक गेली तरी कुठं ? '

' ती पळवून नेली! '

' कुणी ? '

' दादानं ! '

दादा–भगवान–ज्याच्याबद्दल मला भयंकर तिटकारा त्याच्याबद्दल सुरेंद्राला अतिशय प्रेम. रात्रभर मी ज्याच्या नाशाबद्दल विचार केला त्याच्याबद्दल सुरेंद्र रात्रभर तळमळत राहिला ! कां ? तर त्याला घराबाहेर पडावं लागलं म्हणून.

त्याच्या या अशा वागण्याचा उलगडा मला कधींच झाला नाहीं. अन् भगवान असेपर्यंत कधीं होईल असं वाटतही नाहीं ! तो म्हणाला, ' आई, बापूंनीं दादाला घराबाहेर काढला असला तरी त्याला आपल्याकडे जेवायला आणायला काय हरकत आहे ! '

अन् त्यानं तसं म्हणतांच विजेसारखा एक विचार माझ्या मनांत चमकून गेला. आजपर्यंत भगवान इकडे कधींही जेवायला आला नव्हता. आणि आतां तर तो घराबाहेर पडलेला. म्हणून तो येईल कीं नाहीं याची शंकाच होती ! पण तो आला तर...

तर जगांतूनच त्याला नाहींसा करण्याची संधि मला मिळणार होती !

हर्षानंच मी त्याला म्हटलं, ' हो आण ना. '

त्याला मोठा आनंद झाला. अन् जणूं भगवानला बोलावण्याच्या तयारीनंच तो खुर्चीवरून उठला. तेव्हां मी म्हणालें,

‘ पण आतां नको. ’

‘ कां ? ’

त्याच्या त्या प्रश्नांतला रागमिश्रीत स्वर मी ओळखला. पण सुरेंद्राच्या रागापेक्षां त्यांच्या रागाला मी अधिक भीत होतें. मी हंसत हंसत त्याला सांगितलं, ‘ आजच कशाला ? परवांच्या दिवशीं तुझा वाढदिवस आहे. या दोनतीन वर्षांत तुझा वाढदिवस मला करतां आला नाहीं. प्रत्येक वाढदिवशीं तूं आपला कॉलेजांत असायचास. मी तुझा वाढदिवस करणार आहे. त्यादिवशीं बोलाव त्याला ! ’

तें त्यानं कबूल केलं. अन् जेवायला तो खाली आला. जेवण झाल्यावर तो म्हणाला, ‘ ठरलंना दादाला बोलवायचं ? ’

‘ हो ठरलं ! पण मी जशी तुझी ही गोष्ट ऐकली तशी तूंही माझी एक गोष्ट ऐकली पाहिजेस ! ’

‘ कोणती ? ’

‘ तूं तुझ्या बापूंना पत्र लिहिलंयस ना, तें त्यांना दाखवूं नकोस. त्या पत्रानं ते फार रागावतील. मग मला वाढदिवस करतां यायचा नाहीं, भगवानला बोलावतां यायचं नाहीं अन् तुझ्यावरही भलताच प्रसंग येईल ! ’

‘ येऊं दे आला तर ··· ’

‘ तें कबूलरे. पण माझ्यासाठीं म्हणून एवढं ऐकना. वाटल्यास एवढा वाढदिवस झाल्यावर मग तूं त्यांना विचार ! ’

‘ वरं ! ’

म्हणून तो वर निघाला. मी त्याला बजावून सांगितलं,

‘ परवां दिवशीं भगवानला आणलं पाहिजेस अं ! ’

‘ हं. ’

माझ्या मनाला वाटलं, आतां एका प्रश्नाचा चुटकीसरसा निकाल लागेल ! परवां दिवशीं भगवान जेवायला आला, कीं सुरेंद्राच्या वाढदिवशींच भगवानला विष घालून … …

केवढ्यानें तरी दचकलें मी.

पण त्यांत दचकण्यासारखं काय होतं ?

माझ्या सुरेंद्रासाठीं मी एवढं धाडस करूं नये, असं कोण तरी म्हणेल कां ?

---

# यशोदा

१०

म्हणे, कोण तरी म्हणेल कां ?

मीच नव्हें सगळं जग म्हणेल, ‘ तुम्हीं निर्दय आहांत ! ’

स्वतःचा मुलगा स्वतःच्या डोळ्यांदेखत घराबाहेर पडत असतांना गप्प बसणं, म्हणजे निर्दयपणाची कमालच नाहीं कां ?

मी दरवाजांत जाऊन भगवानला हांक मारली. पण त्यानें मागें वळून ‘ ओ ’ सुद्धां दिली नाहीं.

त्यांना तरी लावून द्यावं म्हणून मी जिन्यांतून धांवतच वर निघालें. गडबडीनें जातांना पायरी चुकून मी जिन्यांत आपटलें. माझ्या गुडघ्याला बरेंच लागलें. पण त्याची थोडीसुद्धां कळ मला जाणवली नाहीं. मी चटकन् उठून वर गेलें. अन् त्यांना म्हणालें,

‘ भगवान कुठं निघालाय बघा. त्याला बोलवा तरी ! ’

ते गंभीरपणानें बोलले, ‘ कुठं जातोय ? जाउं दे ! ’

काय करावं , मला कळेना !

मी दिवाणजींना सांगितलें, ‘ दिवाणजी, तुम्ही तरी जा खालीं. त्याला बोलावून आणा ! ’

‘ दिवाणजी, तुम्ही इथनं हलतां कामा नये ! ’

त्यांच्या फर्मानापुढं दिवाणजी तरी काय करणार ? ते जागचे हललेच नाहींत !

मी रागानं बेभान झालें होतें. त्यांना बोलूं लागलें,

‘ तुम्ही माझ्या भगवानला घराबाहेर काढलांत ! त्याच्या जन्मापासून तुम्ही त्याचा द्वेष करीत आलांत, हें मला पुरतं माहीत आहे ! जगांतल्या गरिबांची तर नाहींच—पण स्वतःच्या मुलाची देखील तुम्हाला दया येत नाहीं ! नुसते पाषाणहृदयी आहांत ’

‘ तुम्ही कांहींही बोलला तरी मला वाईट वाटायचं नाहीं. भगवान घराबाहेर पडला यांत माझा कांहीं दोष नाहीं. त्याच्या कृतीचीं फळं त्याला भोगावीं लागत आहेत, त्याला मी काय करूं ? तसंच बघायला गेलं तर तुमच्यापेक्षांही माझं त्याच्यावर प्रेम आहे. पण तें लाथाडून तोच घराबाहेर पडला तर, ‘ मी निर्दय ’ असं कोण तरी म्हणेल कां ? ’

‘ कोण म्हणणार नाहीं ? सगळं जग म्हणेल, ‘ तुम्ही निर्दय आहांत ! ’

‘ म्हणेल, अन् गप्प बसेल ! ’

‘ पण त्याला घराबाहेर काढण्याइतकं त्यानं केलं तरी काय ? ’

‘ काय केलं नाहीं, तें विचारा. त्यानं काय केलं तें सांगायला लागलों तर महाभारताएवढा ग्रंथ होईल ! ’

मला त्यांच्याशीं वाद करायचा नव्हता. भगवानला ते परत बोलावतायत कीं नाहीं हें बघायला मी आलें होतें. पण त्यांनीं जेव्हां

त्याच्याविषयीं अशी बेफिकीरी दाखविली, तेव्हां भगवान परत येण्याची माझी आशा समूळ नष्ट झाली. मी दरवाजाच्या गॅलरींत गेलें. मान उंच करून भगवान जात होता तिकडे पाहिलें! माझ्या अंतःकरणांत कालवाकालव झाली.

भगवान दूरदूर चालला होता!

   

दुसरें दिवशीं माझा गुडघा चांगलाच ठणकूं लागला. पण त्याच्यापेक्षांही माझ्या अंतःकरणाला होणाऱ्या वेदना सहस्त्रपटीनं अधिक होत्या! एक भगवान नसल्यामुळें सगळं घर कसं खायला उठलं होतं. नाहींतर एरवीं तरी भगवान कुठं असतो म्हणा घरांत! आतां कां कुणास ठाऊक! सगळ्या घरालाच एक प्रकारचा भकासपणा जाणवत होता.

आणि रात्रभर माझा डोळ्यास डोळा लागला नाहीं. आश्रमांत तो गणूचा मुलगा प्लेगनं आजारी होता. अन् भगवान तर तिथंच गेलेला असणार! नाहीं नाहीं त्या अशुभ कल्पनांनीं माझं चित्त विचलित होत होतं. त्यांत आणि घुबडाचा घूत्कार नि कुत्र्यांचं रडणं सारखं माझ्या कानावर आदळत होतं. मध्यरात्रीच्या सुमारास एक टिटवी घरावरून 'टीट् टीट् टीट् ट्यूटी!' करीत वरतीकडे गेली. अन् मग माझ्या डोळ्यावरची झांपडही पार उडून गेली. बापलेकांच्या या भांडणाचं भवितव्य काय होणार, या विचारांत मी सगळी रात्र घालविली. ते भगवानला परत बोलावतील असं मला वाटेना. अन् त्यांनीं बोलावलं तरी भगवान येईल कीं नाहीं याची शंकाच होती! भगवानला घरीं आणण्याचा

मला एकच मार्ग दिसत होता. त्याला बोलावण्यासाठीं सुरेंद्राला पाठवून देणें !

सकाळीं मला बातमी कळली, कीं गांवांत प्लेगनं बरेच लोक लागले आहेत. नुसत्या आश्रमांतच सहासात माणसांना प्लेग झाला होता. अन् तें कळल्याबरोबर माझं काळीज हदरून गेलं ! भगवान त्या आश्रमांतच गेला होता !

वाटेल तें करून त्याला आश्रमांतून घरीं आणणं हें माझें कर्तव्य होतं ! मी वर जाऊन त्यांना तसं सांगितलं. पण त्यांनीं माझ्या सांगण्याकडे लक्षच दिलं नाहीं मुळीं ! भगवानला बोलावण्याची गोष्ट बाजूलाच राहिली. शेतकरी कामावर न आल्यामुळें वाड्याचं काम बंद पडलं होतं. आणि त्याला कारण भगवान म्हणून ते त्याच्यावर अधिकच संतापले होते.

नऊच्या सुमारास सुभद्रा आली. तिनं सांगितलं, ' गणूच्या पोराला बरं आहे.. पण दुसरीं सातआठ माणसं लागलीं आहेत. रावसाबांना मी सांगितलं, डॉक्टरनीं सांगितलं तरीही ते रोग्याजवळ गेल्याशिवाय रहात नाहींत. रोग्यांची व्यवस्था करतांना स्वतःला जणूं ते विसरूनच जातात ! '

तें ऐकून माझ्या जिवाची असह्य तळमळ झाली. तसंच धांवत जाऊन भगवानला घरीं आणावं, असं मला वाटलं. पण ते त्याच्यावर संतापले असतांना मी तसं करणं म्हणजे–उसळलेल्या तेलांत पाणी ओतण्यासारखं होतं तें ! तसं केल्यानं एकदम भडका उडाला तर काय बिघडणार होतं ? पण त्या भडक्यांत भगवान-बरोबर मलाही भाजून घ्यावं लागलं असतं. त्या भाजण्याला मी

भीत होतें, असं नाहीं. भगवानसाठीं अग्निदिव्य करायलादेखील मी तयार होईन. पण मी कशाला भीत होतें तें माझं मलाच कळेना!

मी सुभद्रेला सांगितलं, 'कसंही करून भगवानला इकडे लावून दे. मी बोलावलंय म्हणून सांग.'

'ते आले तर अवश्य लावून देतें. पण आले नाहींत तर त्यांची तुम्ही कांहीं काळजी करूं नका. त्यांची सगळी व्यवस्था मी जातीनं करतेंय. आमचे ते परमेश्वर आहेत! त्यांचं सुख तेंच आमचं जीवन आहे!'

सुभद्रा गेली तरी माझ्या जिवाची हुरहूर कांहीं थांबली नाहीं. अन् संध्याकाळपर्यंत मी वाट पाहिलीं. पण भगवान आला नाहीं.

संध्याकाळच्या सुमारास सुरेंद्र आला. अन् आल्याबरोबर तो म्हणाला, 'आई, मला कॉफी हवीय आतां!'

क्षणभर मला त्याचा राग आला. अन् त्याच्या त्या लाडिकपणाचं कौतुकही वाटलं! कॉफी तयार करून मी पेला भरला अन् त्याच्यापुढं ठेवला. तो म्हणाला,

'दोन पेले भर.'

'दोन कशाला?'

'माझ्या आईला हवाय दुसरा!'

'म्हणजे? तिकडे घेऊन जाणार कीं काय?'

'तिकडे कुठं? इथंच आहे कीं माझी आई! अन् तिनं सकाळपासून कांहीं देखील खाल्लं नाहीं.'

त्याच्या त्या बोलण्यात नुसता अल्लडपणाच नव्हता. केवढातरी जिव्हाळा होता.

मी म्हटलं 'कुणी सांगितलं तुला?'

‘ हें सांगावं लागत नाहीं कुणी ! आईचं हृदय तिच्या मुलाला न सांगतां कळत असतं ! ’

‘ तुझ्यासारखा मुलगा असला तर... ! पण भगवानला कुठं कळतंय. दोन निरोप पाठवूनही तो सकाळपासून घरीं आला नाहीं ! ’

‘ हात्तिच्या ! एवढंच ना, मग तें तूं मला नाहीं कां सांगायचंस. मी त्याला ओढून आणला असतां कीं —’

‘ बरं आण मग. ती कॉफी घे अगोदर. नाहींतर सगळी गार होऊन जाईल ! ’

‘ तूं माझ्याबरोबर घेतलीस तर मी घेणार आहे. नाहींतर मला कॉफीची जरूरच नाहीं ! ’

त्याला त्यावेळीं कॉफीची लहर लागणं शक्य नाहीं, हें मी जाणून होतें. मला घ्यायला लावण्यासाठींच त्यानं मुद्दाम कॉफी मागितली होती, हें उघड होतं !

नाहीं म्हणणं माझ्या जिवावर आलं !

मी त्याच्याबरोबर कॉफी घेतलीं.

कॉफी पिऊन झाल्याबरोबर त्यानं खिशांतून भगवानची चिठी काढली अन् माझ्या हातांत दिली.

मी झरझर वाचूं लागलें.

‘ आई,

तुझा निरोप पोंचला, तेव्हां तुझ्यासाठीं तरी घरीं यावंसं मला वाटलं. मी घरीं आल्यानं तुला सुख होईल ! पण इथं प्लेगच्या कह-रांत सांपडलेल्या लोकांचे उद्यां पटापट मुडदे पडूं लागतील ! म्हणजे मी त्यांना वांचवितोंय असं नव्हे. पण रोग्याची व्यवस्था कशी ठेवावी, ही साधी गोष्टसुद्धां या लोकांना माहीत नाहीं. मी, सुभद्रा

नि डॉक्टर आहेत म्हणून त्यांची व्यवस्था चांगली होतेय एवढेंच ! रोग्यासाठीं एकादं फळ आणायचं म्हटलं तरी त्यांचेजवळ पैसा नाहीं ! डॉक्टर तरी कुठून पैसे आणणार ? मीच माझ्याजवळचे सगळे पैसे खर्च केले. आज तुझ्याकडून मला शंभर रुपये हवेत. अन् त्यासाठीं मी सुरेंद्रासह रात्रीं अकराच्या सुमारास घरीं येईन ! त्यावेळीं बापू घरीं नसले तर बरं होईल ! अन् असले तरी काय ! पाण्यांत पडलेला माणूस लाटांना थोडंच भितो ! त्यांना तुडवूनच त्याला पैलतीर गाठायचं असतं !

तुझा,

**भगवान.** '

पत्र वाचून माझ्या मनापुढं एकच प्रश्न उभा राहिला—भगवानला रुपये द्यायचे काय ?

द्यायला काय हरकत होती ?

पण तें त्यांना कळलें तर... ?

तर—

काय होईल ? स्वतःच्या घरांत वर्षाकाठीं खंडीनं धान्य ओतणारे अन् शेंकडो रुपये आणून देणारे शेतकरी, उपासमारीनं आणि रोगानं मरत असतांना त्यांना मदत करूं नये, हा कुठला न्याय !

मी सुरेंद्राला सांगितलं, ' रात्रीं भगवानला घेऊन जरूर ये हं. '

* * *

साडेदहा वाजतांच त्यांनीं गड्याला दरवाजा बंद करायला सांगितलें. अन् ते वर दिवाणखान्यांत जाऊन झोंपले.

त्यावर अकरा वाजले. साडेअकराचा ठोका पडला.

तरीही भगवान आला नाहीं !

माझ्या मनाची अधीरता क्षणाक्षणाला वाढत होती.

थोड्या वेळानं परसदाराकडून भगवानची हांक आली,

' आई ! '

त्या हांकेनं मला केवढा तरी आनंद झाला. मी चटकन् उठून दार उघडलें. भगवान एकटाच आंत आला. नेहमींप्रमाणें त्यानें डोक्याला टोपी घातली नव्हती. अन् उंच कपाळावर पुनः-पुन्हां येणारे केसाचे झुपके उजव्या हातानं मागं सारण्याचा त्याचा चाळा चालू होता. माजघरांत अंथरलेल्या चटईवर तो बसला. मी त्याच्याकडं सारखी टक लावून पहात होतें. जणुं कित्येक वर्षांनींच तो मला दिसला होता.

मी विचारलं, ' सुरेंद्र आला नाहीं ? '

' अं हं. घरीं गेला तो. '

' कां ? '

' माईनं बोलावलं त्याला. तो जात नव्हता. पण मीच लावून दिला त्याला ! '

' तूंच लावून दिलास ? माईचं हृदय तुला कळलं. पण आईचं...? '

' आई ! '

' कांहीं बोलू नकोस. मी तुला अजिबात जाऊं देणार नाहीं आतां !'

' अन् बापू, इथं अजिबात राहूं देणार नाहींत मला ! आणि त्यांचंच बरोबर आहे. आपण नाहीं तर नाहीं, आपल्या मुलानं तरी शेतकऱ्यांच्या उपयोगी पडावं म्हणून त्यांनीं मला घराबाहेर काढला ! पण तूं एवढी शिकलेली असून तुला वाटतं, मी घरांतच बसावं ! तुमच्या या परस्पर विरोधांत मी करूं तरी काय ? '

अशा तऱ्हेचें तो छद्मी बोलेल याची मला कल्पनाच नव्हती. ताट भरीत मी म्हटलं, ' कांहीं करूं नकोस. हें खा अगोदर!'

पण त्याला तितकीशी भूक नव्हतीच. थोडासा भात नि शेवयाचे दोनच घांस खाल्ले त्यानें!

अन् शेवटीं मी पुष्कळ आग्रह केला, तरी आश्रमांत जाण्याचा आपला हट्ट सोडायला तो तयार होईना. मी दहादहाच्या दहा नोटा त्याच्या हातांत ठेवल्या. त्या पँटच्या खिशांत कोंबीत तो परस-दारानं बाहेर पडला, तरीही मला राहवेना. मी म्हटलंच, ' भग-वान त्या नरकांत जाऊं नकोस रे!'

' आई, खांडेकरांची ' स्वर्ग आणि नरक ' ही गोष्ट तूं मोठ्या आवडीनं वाचली होतीस. त्यांतलं तें तत्त्व ' जोपर्यंत एकाचा स्वर्ग शंभरांना नरकांत ढकलीत आहे, तोंपर्यंत नरकांत राहाण्यांतच माणु-सकी आहे!' तूं कितीदां तरी बोलून दाखविलं आहेस! पण तत्त्वं हीं शोभेसाठीं नसतात! त्याप्रमाणें वागण्यांतच माणुसकी आहे!'

' सगळं खरं रे! पण प्लेग हा सांसर्गिक रोग आहे!'

' अन् भांडवलशाही हाही तसलाच रोग आहे! प्लेगच्या संसर्गाला भिऊन मी इथं राहिलों तर भांडवलशाहीचा संसर्ग मला बाधल्यावाचून राहील कां?'

झपझप पावलें टाकून तो दिसेनासा झाला!

भांडवलशाहीचा संसर्ग! भांडवलशाहींत जन्म झाला, सगळं बालपण गेलं, तरी जो संसर्ग त्याला बाधला नाहीं; तो आतांच कसा बाधेल, मला कळेना!

मी धाडकन् दार लोटलें. अन् अंथरुणावर अंग टाकलें!

पण शेतकऱ्यासाठीं रात्रीच्या अंधारांतून धांवणारी भगवानची मूर्ती कांहीं केल्या माझ्या डोळ्यांपुढून हलेना.

बारा वाजून गेले होते. सगळीकडं कसं शांत होतं. अन् त्या शांततेमुळंच मला शेजारच्या घरांतला फोनो स्पष्ट ऐकूं येऊं लागला.

त्या शेजारच्या घरांत एक कवि येऊन राहिले होते. कवि हे वेडे असतात, असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं! बिचाऱ्यांना काव्याशिवाय जगांत दुसरं कांहीं दिसतच नाहीं. वेळीं अवेळीं स्वतः केलेलं काव्य म्हणणं किंवा काव्याची रेकॉर्डस् लावणं एवढाच त्यांचा उद्योग चालतो. जानपद काव्यें करणारे ते प्रसिद्ध कवि आहेत म्हणे! अन् तसलीं काव्यें करण्यासाठींच ते इथं येऊन राहिले आहेत. संध्याकाळच्या सुमारास मजूर वस्तींत चक्कर मारून किंवा एखाद्या शेतांतून फिरून येऊन ते कविता करितात! पण समुद्राच्या पाण्यावर तरंगून कधीं त्यांतली रत्नं मिळतील कां? त्यासाठीं त्याच्या तळाशींच बुडी घ्यायला नको कां? जानपदजीवनाची साधी जिज्ञासासुद्धां त्यांच्या ठिकाणीं नाहीं! त्यांना दूध घालणाऱ्या सदू जाधवानं घरांतले जोंधळे संपल्यामुळें पुढील दुधाचा एक रुपाया आगाऊ मागितला. तो रुपाया देण्याचं तर बाजूलाच राहिलं. पण त्याला तो रुपाया कशाला पाहिजे याची देखील त्यांनीं चवकशी केली नाही. तरीही जग त्यांना जानपदगीताचे कवि म्हणून डोक्यांवर घेऊन नाचतं.

पण असल्या कवीचं काव्य म्हणजे— ज्याला पोहतां येत नाहीं, त्यानं नदीच्या कांठावर बसून पोहण्याच्या गंमती सांगाव्या, तशांतलाच प्रकार नाहीं कां? पण जगाला तरी पोहणाऱ्याची जरूर कुठं आहे? त्याला फक्त पोहण्याच्या गंमती ऐकायला मिळाल्या म्हणजे बस्स!

आतांच पहा कीं, त्यांचा रेकॉर्ड चालू आहे,
घरिं एकच पणती मिणमिणती
म्हणुं नको, उचल, चल लगबग, ती ! ॥
अगणित बांधव बघ अंधारीं
फिरे रान ! भय भंवतीं भारी
चरणिं जिवाणू ! भरे शिरशिरी
यमदूत—न कीटक —किरकिरती !

असल्या काव्याचा उपयोग ते कशासाठीं करतात ठाऊक आहे कां ? आपल्या काव्याचीं चरणं जुळविण्यासाठीं ! ह्या प्रत्येक चरणाबरोबर ते आपल्या मनांतले शब्द म्हणून पहात असतील. मग या काव्यांतले ते अंधारांत चाचपणारे अगणित बांधव, फिरे रान नि ते यमदूतासारखे भासणारे रातकिडे त्यांच्या दृष्टीपुढें येणं कधींतरी शक्य आहे कां ? अन् कुणाच्या येतात ? सगळं जग काव्याकडं कांहीं शिकण्यासाठीं पाहात नाहीं ! त्याला घटकाभर करमणूक हवी असते. अन् म्हणूनच मुलामा दिलेलीं भांडीं चकाकतात, त्याप्रमाणें जानपदगीतें, ग्रामगीतें आणि विडंबनगीतें यांना भाव येतो. काव्यांतलीं तत्त्वं हीं आचारासाठीं नसतात. उच्चारासाठीं नि शोभेसाठीं असतात ! असंच सगळ्या जगाला वाटतं !

पण माझा भगवान म्हणजे, ‘तत्त्वं हीं शोभेसाठीं नसतात. त्याप्रमाणें वागण्यांतच माणुसकी आहे ! ’ याचं मूर्तीमंत उदाहरणच नाहीं कां ?

त्याचा केवढातरी आभिमान वाटला. मी डोळे झाकले ! तरी, गरिबांना प्रकाश देणारी, त्यांच्यासाठीं काट्याकुट्यांतून धांवणारी आणि स्वतःच्या बापाबरोबर लढणारी भगवानची मूर्ती, माझ्या डोळ्यापुढें स्पष्ट दिसत होती !

## भगवान                                    : ११ :

रात्रीं आईकडून येऊन झोंपायला मला एक वाजला असेल. पण सकाळीं मी कितीतरी लवकर उठलों मनाला केवढातरी उत्साह वाटत होता. मी पश्चिमेकडची खिडकी उघडली अन् चूळ भरण्यासाठीं वाकून बाहेर पाहिलें.

दूर नदीकांठावर तीन चिता भडकत असलेल्या मला दिसल्या.

अन् तें पाहिल्याबरोबर माझं मन विषण्ण झालं !

गेले तीन दिवस मी या लोकासाठीं झटत आहे. पण प्लेगचं मान कमी तर नाहींच उलट वाढतच आहे. आणि याला कारण हेच लोक आहेत! तीन दिवस मी न् डॉक्टर यांची सारखी समजूत करतोंय, पण अजून निम्यापेक्षा जास्त लोक प्लेगची लस टोचून घ्यायलाच तयार नाहींत. ज्या देवानं, गांवाला धक्का लावीत नाहीं म्हणून सांगितलं ; तोच देव हा प्लेग नाहींसा करील

असं अजूनहि त्यांना वाटतंय ! अन् प्लेगला सगळा गांव बळी पडला तरी त्यांची ही देवावरची श्रद्धा कमी व्हायची नाहीं.

रात्रीं आईनं मला सांगितलं, कीं तिथं प्लेगच्या संसर्गांत जाऊं नकोस म्हणून ! पण स्वतःच्या अज्ञानामुळें हे अडाणी जीव प्लेगला बळी पडत असतांना, प्लेगच्या संसर्गाला भिऊन मी घरीं तरी कसा बसूं ? 'स्वतः जगण्यापेक्षां दुसऱ्याला जगविण्यांत माणुसकी आहे' हीं अक्षरं माझ्या डोळ्यापुढें नाचत होतीं. अन् त्या दृष्टीनें बापूंनीं मला घराबाहेर काढलं तें बरंच झालं नाहीं कां ? रात्रंदिवस मला या अडाणी जीवांच्या उपयोगी पडतां येईल ! अन् गेले तीन दिवस मी हेंच करीत आहे. लोकांची समजूत करून त्यांना प्लेगची लस टोचणं, गांवाबाहेर झोपड्या बांधून त्यांत लोकांना राहायला पाठविणं अन् रोग्यांना काय हवं नको तें पाहाणं, यांत सगळा दिवस केव्हां जातो तें मला कळत देखील नाहीं.

डॉक्टरांना तर क्षणाचीही फुरसत नाहीं. रात्रंदिवस ते रोग्याची सेवा करीत असतात. अन् त्यांची ती निरपेक्ष सेवा बघून मला कार्य करायला अधिकच उत्साह वाटतो.

मला त्या धडधडत्या चितांकडे पाहवेना. म्हणून मी पूर्वेकडील खिडकी उघडली. वद्य पक्षांतल्या लुकलुकणाऱ्या चंद्राची कोर बरीच वर आली होती. एकदोन दिवसांत अमावास्या येईल. आषाढाचा पहिला दिवस उगवेल. पण अजून पेरण्या करण्यासारखा पाऊस झाला नाहीं. दरवर्षी या दिवसांत पेरण्याची हातघाई उठायची नुसती ! पण या प्लेगच्या कहरामुळं यंदा पावसाची अन् पेरणीची कुणाला आठवणच नाहीं. या प्लेगच्या खाईत दुष्काळाची भर पडली तर... !

त्या विचारानं माझ्या आंगावर कांटा आला.

आणि तितक्यांत पहाटेच्या थंड वाऱ्याचा झोतच्याझोत माझ्या आंगाला झोंबला. पण त्याच्याबरोबर बागेंतल्या फुलांचा जो सुगंध दरवळला तो मला तितकाच आल्हाददायक वाटला !

गेल्या तीन दिवसांत माझा व्यायाम चुकला होता. आज तरी व्यायाम करावा, म्हणून मी अंगांत शर्ट घातला अन् तालमींत जाण्यासाठीं बाहेर पडलों !

तालमींत जाऊन व्यायामाला सुरवात केली. पण शंभरएक जोर काढले नाहींत तोंच माझे हात भरून आल्यासारखे झाले. अन् सगळ्या शरीरालाही थकवा आला. पांचपांचशें जोर काढणारा मी. पण आज असं कां व्हावं, याचं मला नवल वाटूं लागलं. बाकी दिवसभर राबून नि रात्री बाराबारा वाजेपर्यंत जागून व्यायाम करवणार तरी कसा ? मी कसेंबसें आणखी शंभर जोर काढले. आणि व्यायाम बंद करून आश्रमांत आलों.

नुकतं कुठं तांबडं फुटलं होतं. पण आश्रमापुढील सगळं आंगण झाडून स्वच्छ केलेलं अन् त्यावर सडा टाकलेला मला दिसला. मला आश्चर्य वाटलं ! आश्रमाचा गडी तर आजारी होता. मग हें कुणी केलं ?

सुभद्रा !

हो तिनंच केलं असलं पाहिजे ! तिच्या त्या कृतीचं मला कौतुक वाटलं. पण माझ्या आळशीपणाबद्दल मात्र राग आला. तालमींत जातांना मी माझा बिछाना देखील काढला नव्हता. तो काढून खोली स्वच्छ करावी म्हणून मी माझ्या खोलीकडे निघालों. तोंच पूर्व बाजूच्या पडवींत सुभद्रा गायीची धार काढीत होती ती

मला दिसली. अन् मग क्षणभर मी तिच्याकडेच पाहात उभा राहिलों.

या पंधरा सोळा वर्षांच्या पोरीला हें एवढें कष्ट करायला कुणी शिकविलें? पण स्त्रियांना हें शिकवावं लागत नाहीं हेंच खरें! उपजतच त्यांना सेवाधर्माची दीक्षा मिळालेली असते. दिवसभर ही माझ्या बरोबर असतेच. शिवाय स्वयंपाक करणं, आश्रमाची झाडलोट करणं नि गाईम्हशींची व्यवस्था करून त्यांच्या धारा काढणं—सगळीं कामें कशी व्यवस्थित अन् वेळच्यावेळीं करते. आणि अशातूनही वेळ काढून कांहीं तरी लिहीत असते, वाचीत असते! अशा पोरीचें कौतुक कुणाला वाटणार नाहीं! काल जेवतांना डॉक्टर म्हणाले,

'भगवान, आतां आश्रमांतली टापटीप कशी काय वाटते तुला?'

'फारच सुंदर!'

'पण कशामुळें ठाऊक आहे कां? एक देवी आलीय आश्रमांत!'

त्यावर सुभद्रा म्हणाली, 'अन् एक देवसुद्धां—'

मग मीही थट्टेनें म्हटलें, 'पण या देवीला आपला देव कांहीं तुरुंगांतून आणतां येत नाहीं!'

त्यावर सुभद्रा जी लाजून पळाली, ती आम्हांला वाढायलासुद्धां लवकर बाहेर येईना. हंबीरवर तिचें केवढेंतरी प्रेम आहे. तो तुरुंगांत गेला म्हणून रावजी अजून वाईट वाटून घेतोय. पण ही कधीं त्याबद्दल हळहळली नाहीं, कीं कधीं रडत बसली नाहीं. त्यानें गुन्हा केला असला तरी, ज्या गुन्ह्याचा आळ सगळ्या शेतकऱ्यांवर आला असता तो स्वतःवर घेऊन हंबीर तुरुंगांत गेला यांतच तिला

अभिमान वाटतोय! अन् त्या अभिमानानें ती सतत हंसत नि खेळत आपलं काम करीत असते.

आतांच पहा. केवढ्या उत्साहानें ती धार काढीत आहे. गुडघ्यांत धरलेल्या कासंडींत ती दोन्ही हातानें भराभर धारा ओढीत आहे. कासंडी दुधानं फेसाळली आहे. अन् त्या उत्फुल्ल फेसा-प्रमाणें तिचें तारुण्यही ओसंडत आहे नुसतं! गाईच्याआड असल्या-मुळें तिचं हंसरं मुख मला दिसत नव्हतं, तरी तिच्या मर्दानी गोल पिंढऱ्या आणि खालींवर होणाऱ्या हातांतल्या काचेच्या बांगड्या जरादेखील ढळत नव्हत्या अशीं तिचीं भरींव मनगटें मला स्पष्ट दिसत होतीं. तिच्या त्या पुष्ट अवयवांकडे अन् कष्टाळ वृत्तीकडे पाहिलें, कीं आधुनिक काळांतली वीरवृत्तीची स्त्री म्हणून मला तिचा केवढातरी अभिमान वाटतो.

'सेवावृत्ति जणुं संजीवन' हें चरण गुणगुणत मी खोलींत गेलों. माझा बिछाना व्यवस्थित गुंडाळून ठेवलेला, सगळी खोली झाडून स्वच्छ केलेली अन् डॉक्टरांच्या फोटोला ताज्या फुलांचा हार घात-लेला मला दिसला. माझ्या टेबलावरही गुलाबाचीं दोनचार टपोरीं फुलें हंसत होतीं. हें सगळें सुभद्रेशिवाय कोण करणार? मी 'सेवा-वृत्ति जणुं संजीवन' हें चरण मोकळ्या गळ्यानें म्हणूं लागलों.

'अहो कविराज—' बाहेरून हांक आली.

मी पुढें होऊन दार उघडलें. माझ्यासाठीं ताजें दूध घेऊन सुभद्रा आली होती. जवळ जवळ झडपच घातली मी त्या दुधा-वर. किती गोडगोड लागलं तें मला! घरींदेखील मी नेहमीं निरसें दूध घेत असे. पण या दुधाची गोडी कांहीं निराळीच होती. जणुं धार काढतांना सुभद्रेच्या हातांतली गोडीच उतरली

होती त्यांत ! दूध घेतल्यावर मी म्हटलें, ' लेखिकांना लेखकांशिवाय अन् कविशिवाय दुसरें कांहीं दिसतच नाहीं जगांत ! '

' तें कसं काय ? '

' क्षणांत तूं मला कवि म्हणून मोकळी झालीस कीं—'

' मग खोटं आहे कां तें ? '

' नाहीं तर खरंच वाटतं ? '

' कळेल आज संध्याकाळीं खरं कां खोटं तें. '

' म्हणजे ? '

' तसं कांहीं विशेष नाहीं. एका कवीच्या कांहीं कविता सुरेंद्र गाऊन दाखविणार आहेत ! '

हा कवि दुसरा तिसरा कोणी नसून मीच असणार हें मी ओळखलं. मला काव्याची पहिल्यापासूनच गोडी आहे. अनेक कवींच्या सुंदर सुंदर कविता उतरून घेण्याचा मला केवढा तरी नाद असायचा. गेल्या वर्षी पिकानं बहरलेलीं रानं बघून मी सहज कांहीं कविता केल्या होत्या. पण कित्येक दिवसांपासून मी पाहतोय, ज्या वहींत त्या उतरल्या होत्या ती वहीच मला सांपडत नव्हती. ती या सुभद्रेला तर सांपडली नसेल ? अन् हेंच खरं असलं पाहिजे. म्हणून मी थट्टेनें म्हटलें, ' पण मी नाहीं तें ऐकायला येणार ! '

' कां ? '

' काव्यानं कांहीं पोट भरत नाहीं ! '

' पोट भरण्यासाठींच जगायचं नसतं ! तसं असतं तर, सोन्या-सारखं घर सोडून तुम्ही इथं प्लेगच्या कहरांत आलाच नसता ! '

' खरं आहे तें ! ' मी स्वतःशींच म्हणालों.

इतक्यांत दादूनें टपाल आणलें. त्यांत मासिकाचा एक अंक होता. तो फोडून मी त्याची सहज अनुक्रमणिका चाळली. त्यांत सुभद्रेचें नांव दिसलें. मी हर्षानंच म्हटलं,

‘ सुभद्रा, तुझी गोष्ट आलीय कीं यांत ! ’

मी भरभर तिच्या गोष्टीचें पान काढलें अन् वाचूं लागलों,

## ‘ सुंदर संगीत ! ’

वाऱ्याच्या मंद झुळकेवर तो उसाचा सगळा फड मोठ्या आनंदानें डुलत होता. एक आठवडा होत आला, त्या उसांना पाण्याचा थेंबसुद्धां मिळाला नव्हता. अन् दुपारच्या उन्हानें तर त्यांचा जीव कासावीस व्हायचा नुसता ! पण ती कटु आठवण ते विसरून गेले. अन् चंद्रिकेंत न्हाऊन निघतांना त्यांना क्षणभर कां होईना समाधान वाटलें. इतक्यांत कुठूनसे सुंदर आलाप त्यांच्या कानावर आदळले,

‘ कर्रर्र कर्रर्र, कुर्र कुर्र...... ! ’

किती सुंदर संगीत ! ते ऊस अधिकच डोलूं लागले. जणूं त्या रागदारी संगीतांत ताल धरायचें काम त्यांच्याकडेच होतें !

इतक्यांत दोनचार गडी हातांत कुऱ्हाडी घेऊन त्या फडांत आले.

उसांनीं मोठ्या आतुरतेनें विचारलें, ‘ कोण गातंय तें ? ’

‘ चरक ! ’

‘ किती छान गातोय ! खरा कलावान. ’

थोड्या वेळानें तें संगीत बंद झालें. ऊस त्यांत मुग्ध झाले होते. त्यांना राहवेना. ते पुन्हां म्हणाले, ‘ बंद झालं वाटतं गाणं ! ’

‘ विसांवा घेत असेल तो. ’ गड्यांनीं सांगितलें.

‘ आतां सुरवात केव्हां करणार ? ’

‘ आम्हीं गेल्याबरोबर. ’

गड्यांनीं त्या उसांचे कवळे घेतले. अन् ते चालूं लागले. आतां आपलं काय होणार, म्हणून उसांना मोठी काळजी पडली. त्यांनीं भीत भीत विचारलें, ‘ कुणीकडे नेतां आम्हांला ? ’

‘ तें संगीत ऐकायला ! ’

‘ स्वर्गातच चाललों आहोंत कीं मग ! ’ उसांचें मन आनंद-सागरांत पोहूं लागलें नुसतें !

ते ऊस ठिकाणावर पोंचले. अन् लगेच संगीताला सुरवात झाली. कसलें संगीत तें ? चरकरुपी यमयातनांत पिळून निघणाऱ्या त्यांच्याच भाऊबंदांचे करुण चित्कार होते ते ! धडकीच भरली त्या नव्या उसांच्या हृदयांत !

कानांत बोटें घातलीं त्यांनीं.

पण तें भयंकर संगीत ऐकावं अन् गावंही लागलं त्यांना !

दलित वर्गाच्या अज्ञानावर लिहिलेली ही लघुतमकथा कितीतरी आवडली मला. मी सुभद्रेला म्हटलें, ‘ फार छान आहे हं तुझी गोष्ट ! ’

‘ छान गोष्टीच्या कांही भाकरी होत नाहींत ! ’

मी मघाशीं काव्यावर जें बोललों त्यावर तिचा हा टोमणा होता. मी म्हटलें, ‘ पण जिलबीपुढें भाकरी आवडेल तरी कुणाला ? ’

* * *

दुपारीं सुरेंद्र आला. बापूंनीं त्याला सक्त ताकीद दिली होती, ‘ तूं आश्रमांत नि भगवानच्या संगतींत अजिबात जातां कामा नये. ’

तरीही तो आला होता. त्याची समजूत करून त्याला मी जायला सांगितलें. तेव्हां वाईट तोंड करून तो म्हणाला, ' दादा, वडील माणसं सगळीं सारखींच कशीरे ? लहानावर अधिकार गाजवितांना तुम्हाला अगदीं उन्माद चढतो जसा ! अन् आपण मात्र, लोकां सांगे ब्रह्मज्ञान आपण ... ! बापूंनीं तुला इतकं सांगितलं. तूं ऐकलंस कां त्यांचं ? मग मीच काय म्हणून त्यांचं न् तुझं तरी ऐकूं ? मला जी गोष्ट आवडते ती मी एकदांच नव्हे शंभरदा करीन ! आश्रमांत येईन, तुझी संगत क्षणभरही सोडणार नाहीं अन् प्लेगच्या वस्तींतही फिरेन ! '

त्याला समजून सांगतां सांगतां माझ्या नाकीं नव आले. तरीहि संध्याकाळीं येतो म्हणून तो निघून गेला.



दिवसभरच्या श्रमानं माझ्या शरीराला नि मनालाही थकवा आला होता. जरा बंर वाटावं म्हणून मी नदीकांठानं फिरावयास गेलों. रामोशांचीं दहावीस पोरं नदींत गळ टाकून मासे धरीत बसलीं होतीं. त्यांना सांपडलेले मासे पहावें म्हणून मी प्रत्येकाजवळ गेलों. पण कोणालाही मासे सांपडले नव्हते. त्याबद्दल मी एकाला विचारलें. तो मोठ्या निराशेनें म्हणाला ' हें नवं पानी आल्यापस्न मासं घावत नाहींती. ह्येच्या अगुदर मायंदाळ मासं मिळत हुतं खायाला ! पन आतां... '

' आतां काय खाणार तुम्ही ? '

'काय खायाचं ! दाणंबी उडाल्याती. ह्ये मासंबी घावत नाहींती ! '

नवं पाणी बघून आम्ही आनंदानं बेहोष होतों. पण तेंच नवं पाणी

यांना काळासारखं वाटत असेल. पाणवठ्याच्या खालच्या बाजूला भिकाऱ्याची दोन तीन पोरें एकमेकांत भांडत होतीं, तिकडे माझें लक्ष गेलें. त्यांचें भांडण सोडविण्यासाठीं मी गेलों. पण तें भांडण सोडवायच्या अगोदर मला स्वतःचें नाक दाबून धरावें लागलें! त्या तिघांनीं मिळून गांवांतलं एक मांजर पकडून आणून तें भाजलं होतं. त्याच्या मांसाचे तुकडे एका पोरानें जास्त घेतले होते, म्हणून दुसरे दोघे त्याच्याशीं भांडत होते. त्यांचें भांडण मी कसं सोडविणार ?

कांहीं न बोलतां मी आश्रमाकडे चालूं लागलों.

संथ वाहणारें नदीचें तांबूस पाणी, नदीच्या दुतर्फा दिसणारी गारगार झाडी नि शीतल वारा माझ्या मनाला रिझवूं शकला नाहीं. उलट माझं मन अधिकच उद्विग्न झालं.

मारुतीच्या देवळाला वळसा घालून मी मजूर वस्तींत आलों, तेव्हां चांगलाच अंधार पडला होता. पण तिथल्या एकाही झोंपडींत दिवा लागलेला नव्हता. ज्यांना कोरड्याशांत घालायला देखील कधीं पळीभर तेल मिळायचं नाहीं; त्यांनीं दिवे जाळायला कुठलें तेल आणायचें ? बापूंच्या वाड्यांत रात्रभर बत्त्या जळत असतात. त्यांतल्या एकाद्या बत्तीनंसुद्धां इथल्या सगळ्या मजुरांना प्रकाश मिळेल. क्षणभर मला वाटलं, तसला प्रकाश नाहीं हेंच बरं आहे. बत्तीच्या झगझगीत प्रकाशांत यांचं दैन्य अधिकच उघडं व्हायचं नाहीं कां ? हें दैन्य नाहींसं कसं करतां येईल हेंच अगोदर बघायला पाहिजे. मी पुढं चाललों. चुलींत जाळ करून त्याच्या उजेडांत कुणी तुकडे मोडीत होते तर कित्येक अंधारांतच खडखडत होते. फक्त एका झोपडींत भाकरी होत असलेल्या मला दिसल्या. पण भाकरी पुऱ्या भाजायच्या अगोदरच त्या ओढून घेऊन मुलें कोर-

ऱ्याच गिळीत होतीं. वाटेवरच्या दगडावर बसलेल्या एका म्हाताऱ्याला मी विचारलें, ' काय बाबा, जेवण झालं कां ? '

तो शांतपणें म्हणाला, ' एकदां करून आलोय. आतां दुसऱ्यांदा करायला जाणार आहे ! '

मला त्याच्या बोलण्याचा कांहींच अर्थ कळला नाहीं.

मी विचारलें, ' कुठं ? '

' देवाघरीं. त्याच्याशिवाय या जगांत आम्हांला कुठं जेवण मिळणार ? '

केवढं कटु सत्य होतं त्याच्या बोलण्यांत ! मला भडभडून आलं. जगांतली जनावरदेखील उपाशी राहात नसतील. पण हीं माणसं—उद्योग करणाऱ्या या माणसांना उपाशी मरण्याचा प्रसंग कां यावा ? याचें उत्तर एकच नाहीं कां ? भांडवलशाही ! ऐतखाऊंनीं धान्याचे ढीगच्याढीग साठवावें अन् तें पिकविणाऱ्या कामकऱ्यांनीं मात्र अन्नाविना मरावं असं चालू आहे तोंपर्यंत—

अन् त्या शेवटच्या दृश्यानें तर माझा [illegible] विश्वासच नाहींसा होतोय, कीं काय असं मला वाटलं. दोन तीन मुलं भाकरीसाठीं रडत होतीं. अन् तीं कांहीं केल्या गप्प राहिनात. तेव्हां त्यांची आई त्यांना म्हणत होती, ' काय देऊं तुम्हास्नी खायाला ? गांवांत माणसं पिलीगानं पटाटा मरत्यातीं. अन् तुम्हास्नीच त्यो कुठं चुकलाया ! '

माझा जीव जाऊंद्या, पण माझ्या बाळाला वांचवा ! असं म्हणणारं आईचं हृदय इतकं कठोर कशानं झालं ? माझा माझ्या कानांवर विश्वासच बसेना. माझं मस्तक सुन्न होऊन गेलं ! बापूंच्या घरीं दहावीस पेवं धान्यानं भरलेलीं आहेत, अन् इथलीं

माणसं अन्नाविना मरत आहेत ! यांच्याकरितां थोडं तरी धान्य खर्च करण्याची सुबुद्धि त्यांना कां होऊं नये ?

पण नाहींच—

गरिबांचीं दुःखं श्रीमंतांना कधींच कळायची नाहींत.

माशावर जगणारीं तीं रामोशांचीं पोरं, मांजर भाजून खाणारे ते भिकारी, अन् अन्नाला महाग झालेलीं हीं खुराड्यांतलीं माणसं, यांना प्लेगसारखा रोग म्हणजे, या खडतर जीवनांतून सुटण्याचा यशस्वी मार्ग वाटला तर नवल काय ? अन् आम्ही प्लेग हटविण्याचा प्रयत्न करतोय ! हा असला प्रयत्न म्हणजे—रोग पोटांत आणि औषध डोक्यावर अशांतलाच प्रकार नाहीं कां ? यांना पोटभर खायाला कसं मिळेल हेंच अगोदर बघायला पाहिजे.

मी आश्रमांत आल्याबरोबर सुभद्रेनें सांगितलें, 'चार वाजतां बापूसाहेब आले होते.'

'कशाला ?'

'उद्यां वाड्याच्या कामावर आलंच पाहिजे म्हणून सांगायला !'

'मग ?'

'बाबांनीं त्यांना पुष्कळ विनविलं, कीं 'तुमच्या कामावर यायला कुणाची ना नाहीं. पण इथं प्लेगनं अन् पोटानंही लोक मरूं लागलेत. तुम्हीं यांना पोटापुरतं धान्य देत जा, म्हणजे उद्यांपासून सगळे लोक कामावर येतील.' यावर बापूसाहेबांनीं काय उत्तर दिलं माहीत आहे कां ?'

'काय ?'

'सगळे लोक मेले तर मला कांहीं सुतक येत नाहीं. जसा तुम्ही वाडा जाळला तसा तो बांधून द्यायलाच पाहिजे !' हें त्यांचें

बोलणें तिथें उमा राहिलेल्या आकाराम मोहित्याला कांहीं सहन झालें नाहीं. तो म्हणाला, ‘ मरणाच्या दारांत पडलेल्या माणसाला जिवाणूची भीति ती काय वाटणार ? तुम्हांला काय करायचें तें करा ! तुमच्या कामावर कुणीच येणार नाहीं. ’

‘ तुम्हाला यावं लागेल ! न आलात तर— ? ’

‘ काय ? ’

‘ सगळा आश्रम पेटवून देईन ! ’

‘ खुशाल पेटवा. आश्रम तुमचा आहे. त्यांत राहणारीं हीं गरीब माणसं एकदां मेलीं, म्हणजे तेवढेंच तुम्हांला समाधान लाभेल ! ’

त्यावर रागारागानें बापूसाहेब निघून गेले.

अगोदरच माझें मस्तक भडकलें होतें. त्यांत आणि ही बातमी कळल्यामुळें माझ्या डोक्यावर घणाचे घाव बसत असल्यासारखे झाले. इतक्या जमिनी, भरपूर पैसा आणि मुबलक धान्य जवळ असतांना बापूंची वृत्ति अशी कां व्हावी, याचा मला उलगडाच होईना. यावर काय उपाय करावा याचा विचार करण्यांत मला जेवणदेखील गेलें नाहीं.

सुरेंद्र कांहीं कविता गाऊन दाखविणार होता ; तिकडेही जायची मला इच्छा झाली नाहीं. पण सुरेंद्रानें जेव्हां मला ओढूनच नेलें तेव्हां त्याच्याबरोबर जाऊन दिवाणखान्यांत मी कसातरी बसलों. डॉक्टर, रावजी, सुभद्रा, सुरेंद्र न् मी यांच्याशिवाय दुसरं कुणीच नव्हतं तिथं. सुरेंद्राच्या हातांत माझीच वही दिसत होती. त्यांतलें एक पान उघडून तो म्हणूं लागला,

फुललं समदं श्यात । चहुकडं । फुललं समदं श्यात ॥ धृ० ॥
‘ लहिरी ’ तारा नाचत आल्या

आभाळांतुन इथं उतरल्या
समद्या शेतीं भरुन राहिल्या
बघतां यांना भरून आलं, लइ माझ्या हुर्द्यांत ॥ १ ॥
निशिकंदाचीं फुलंच फुललीं
कीं बगळ्याचीं पिसं गळालीं
झाडाझाडांवर तीं बसलीं
अन् अवखळ तीं बागडत्यातीं सोनेरी किरणांत ॥ २ ॥
आयाबाया साऱ्या मिळुनी
आल्या हिरवा शालु नेसुनी
आणि फुलांची रास घेउनी
मावळतीच्या त्या राजाला, पुजण्याला शेतांत ॥ ३ ॥
हंसाचीं हीं पिलं भासतीं
सरोवरांतून भूवर येतीं
अन् वाऱ्यावर नाचनाचतीं
नाजुक बाळं कशीं खेळतीं, आनंदें शेतांत ॥ ४ ॥
कां सृष्टीनें ‘ लह्या ’ भाजिल्या
तडतड उडुनी ‘ बाहिर ’ पडल्या
त्या वेचाया चला जाउंया
म्हणुनी आली ‘ शेतकरिण ’ ही पहा त्रिगी शेतांत ॥ ५ ॥
पर्‌सन झाली धरणीमाता
म्हणुनी धन हें येई हातां
पैरण पोरांना, मज कुडता
अन् ‘ तिजला ’ ही सुंदर साडी घेईन या सालांत ॥ ६ ॥

मीच गेल्या वर्षीं फुललेलें कापसाचें शेत बघून केलेली ही कविता होती. पण ती म्हणतांना सुरेंद्र जितका रमला, तितका कां कुणास ठाऊक, मी कांहीं रमलों नाहीं. सुरेंद्रानें दुसऱ्या कवितेला सुरुवात केली होती. अन् त्याचवेळीं आश्रमाच्या मागील बाजूस एकदम आरडाओरड झालेली आम्हांला ऐकूं आली. मी धांवतच बाहेर जायला निघालों. पण दारांना बाहेरून कड्या होत्या. नक्कीच कांहींतरी दगा होता! मी जोर करून दाराच्या एका फळीला हिसडा दिला. कडी तुटूनच दार उघडलें! तसल्या अंधारांत सुभद्रा तालमीकडे धांवत गेली, अन् मी मागें गेलों. बॅटरीचा प्रकाश पाडून मी पाहिलें. पंधरा एक बेरड शेतकऱ्यांना बडवीत होते. आणि 'उद्यां वाड्याच्या कामावर येणार कीं नाहीं?' असें विचारीत होते.

'नाहीं' हा शेतकऱ्यांचा मंत्र चालूच होता.

माझ्या तळपायाची आग मस्तकाला गेली. लाठी घेऊन मी त्या बेरडांवर तुटून पडलों. तितक्यांत तालमींतूनही लाठीबंद तरुण धांवत आले. घटकाभर लाठीच्या फटाफट आवाजाशिवाय दुसरा कसलाही आवाज ऐकूं आला नाहीं. माझ्या दंडावर एक जोराचा प्रहार झाला नि त्याच्या झिणझिण्यामुळें क्षणभर माझ्या डोळ्यापुढें अंधेरी आली. बेरडांवर लाठीमार चालूच होता. पण ते हटायचे कांहीं चिन्ह दिसेना!

तेवढ्यांत सुरेंद्रानें माझें पिस्तुल माझ्या हातांत दिलें. भराभर मी त्याचे दोनतीन बार काढलें. गोळीबार ऐकल्याबरोबर मात्र ते अडाणी बेरड ताबडतोब पसार झाले!

या गरीब शेतकऱ्यांवर मारेकरी सोडण्यापर्यंत बापूंची मजल गेली. त्यांना वाटतं, हीं गरीब मेंढरं आपण वाकवूं तशीं वाकतील!

पण हीं मेंढरं असलीं तरी त्यांना जगायचं आहे. आपलं रक्त पिणाऱ्या लांडग्यावर हे सगळे तुटून पडले तर—अन् त्यांनीं कां पडूं नये?—बापूसकट त्यांच्या सगळ्या वाड्याची राखरांगोळी करतील कीं!

असल्या भयंकर विचारांचा ज्वालामुखी रात्रभर माझ्या मनांत धुमसत होता!

❂ ❂ ❂

सकाळीं मी जागा झालों, तेव्हां मला धड उठतां देखील येईना इतका माझा दंड ठणकत होता. आणि त्यावरचा काळानिळा वण स्पष्ट दिसत होता. पण डॉक्टर बघायला आले तेव्हां मी सांगितलं, 'छे छे, जरासुद्धां दुखत नाहीं! तुम्ही जा आपले रोग्यांकडे!'

अन् ते गेल्यावर जेव्हां दादूनं तेल लावून तो चोळला आणि ऊन पाण्यानें शेकला, तेव्हांच मला बरें वाटलें!

सुरेंद्र रात्रीं मजजवळच झोपला होता. पण बापू कांहींतरी म्हणतील म्हणून पहांटेच उठून तो घरीं गेला होता. आठाच्या सुमारास येऊन त्यानें मला सांगितलें,

'आज माझा वाढदिवस आहे. तूं जेवायला आलं पाहिजेस!'

'कुठं?'

'खालच्या वाड्यांत.'

'बापू असतील ना तिथं?'

'छे! वरच्या वाड्यांत आज सत्यनारायण आहे. केडगांवचे नारायणमहाराज येतील आतांच्या गाडीनं!'

'ठीक आहे!' म्हणत मोठ्या आनंदानें त्याच्याबरोबर जेवायला जायचं मी कबूल केलें!

———

## तारा

: १२ :

कड्यावरून उडी टाकायला निघालेल्या माणसाचे डोळे गरगर फिरतात ना, अगदीं तस्सं झालंय आज मला! माझे डोळे तर फिरतायतच आणि हजारो शंकाकुशंकांनीं मनहि सारखं बावरतंय! आज वरच्या वाड्यांत सत्यनारायण चाललाय, इथं सुरेंद्राचा वाढदिवस होणार अन् अशा या पवित्र दिवशीं मी भगवानला—अंगावर कसा झर्रकन कांटा येतो!

सुरेंद्रासाठीं मी कड्यावरून उडी घ्यायचं धाडस करायला तयार झालें खरी. पण खाली गवताच्या गालिचावर पडलें तर ठीक! नाहींतर सगळ्या दैवी शक्ति उलटून एकाद्या शिलेवर आपटून कपाळमोक्ष व्हायला कांहीं वेळ लागणार नाहीं! अन् झाला तरी काय बिघडणार आहे? स्वत:च्या मुलासाठीं माता वाटेल तें दिव्य करूं शकते! या दिव्यांत मी भाजून मेलें तर 'एक प्रेमळ माता' म्हणून जग माझे गोडवेच गाईल!

भगवानच अगोदर इकडे येईल कीं नाहीं याची जिथं निश्चिती नाहीं, तिथं मी असल्या शंकाकुशंकांनीं स्वतःचं मन बावरून देणं म्हणजे—पण नऊच्या सुमारास एकाद्या अल्लड मुलाप्रमाणें सुरेंद्र धांवत आला. अन् त्यानें सांगितलें,

'आई, दादानं जेवायला यायचं कबूल केलं !'

त्याच्या आनंदापेक्षां मला झालेल्या हर्षांतच मी वेडावून गेलें.

पण क्षणभरच !

दुसऱ्याच क्षणीं मला वाटूं लागलं, यशोदाबाईंचा कंठमणि आपल्या लाडक्या सुरेंद्राचा जिवलग नि शेतकरी--मजूरांचा कैवारी अशा भगवानचा मी घात करणें, हें जगाला, देवाला अगर त्याच्यावर आग पांखडणाऱ्या खुद्द बापूसाहेबांना तरी आवडेल का? पण असल्या गोष्टी दुसऱ्याला आवडण्यासाठीं थोड्याच करायच्या असतात? आणि देवाधर्मांचं नि जगाचं बुजगावणं हें दीनदुबळ्या लोकांसाठीं असतें. जो चालू घडीचा फायदा घेतो तोच जीवनांत यशस्वी होतो !

या विचारानें मी स्वयंपाकाला लागलें !

तरी भगवानच्या आवडीचे पदार्थ करतांना माझ्या हृदयाचा सारखा थरकांप होत होता. त्याची ती निष्पाप आनंदी मुद्रा माझ्या डोळ्यापुढें पुनः पुन्हां येत होती ! आणि मी हें करूं कीं नको ? याबद्दल माझ्या मनांत पुनः पुन्हां संदेह उभा राहात होता. माझ्या ठिकाणीं एकादी सामान्य स्त्री असती तर ती या गोष्टींनीं पुरी बावचळून गेली असती. पण असल्या गोष्टीचा विचारच न करण्याइतकें मन खंबीर करून मी सर्व तयारी केली.

पण मन म्हणजे कांहीं मेरू पर्वत नाहीं; तें वाऱ्यासारखें चंचल

असतें ! भगवानला घेऊन सुरेंद्र आला तशी माझ्या मनाची चल-बिचल पुन्हां सुरू झाली. हातपाय धुवून ते दोघे जेवायला बसले, तेव्हां तर माझें मन पुरें बावचळून गेलें.

भगवानचें ताट तयार करतांना माझे हात थरथर कापूं लागले. अन् तें ताट बाहेरच्या खोलींत नेऊन त्याच्यापुढें ठेवतांना तर माझें हृदय धडधडूं लागलें, हातपाय गळल्यासारखे झाले अन् कसली तरी भयंकर धुंदी माझ्या मनावर चढली असल्याचा मला भास झाला. मी कसेंबसें तें ताट भगवानच्यापुढें ठेवलें. त्या ताटांतील ते निर-निराळे पदार्थ बघून भगवान म्हणाला,

' माई, मोठाच बेत केलाय कीं तुम्ही ! '

' माई, माई, माई ! ' क्षणभर मला सगळीकडे भगवानचे चेहरे आणि ही हांकच दिसूं लागली. माझ्या मनावरचा ताबा पार उडाल्यासारखा झाला होता. तरी अवधान राखून मी म्हटलें,

' तिकडच्या सत्यनारायणाएवढा तर नाहीं ना ? '

' सत्यनारायणांत काय असणार आहे ! नुसती शिऱ्याची लय-लूट तेवढी ! असलीं पक्वान्नं तिथं बघायला तरी मिळतील कां ? '

' आणखी करणार होतें. पण म्हटलं, तूं येतोस कीं नाहीं—'

' असली शंका तुम्हाला आली तरी कशी ? सुरेंद्राचा शब्द मला कधींतरी मोडवेल कां ? अन् शिवाय दुसरी गोष्ट अशी होती, कीं त्या सत्यनारायणाचा प्रसाद कांहीं आम्हांला मिळणार नव्हता. मग हा वाढदिवसाचा हक्काचा प्रसाद मी कसा सोडीन ? '

मी मनांत म्हटलें, ' पुरें कीं आतां. या प्रसादाचें वर्णन आणखी दोन घटकांनीं काय तें कर ! '

सुरेंद्राला ताट आणण्यासाठीं मी आंत गेलें.

ताट घेऊन मी बाहेर आलें मात्र—

धरणी दुभंगली असती, किंवा सगळं घर कोसळून पडलं असतं तरी मला जेवढा हदरा बसला नसतां त्याच्या हजारोपटीनं मी एकदम हदरलें.

आपला पाट फिरवून सुरेंद्र भगवानपुढें बसला होता. आणि त्या ताटांतील घास मोडून दोघेही हात तोंडाकडे नेत होते.

माझे हातपाय लुले पडल्यासारखे झाले. तोंडांतून एक शब्द निघेना अन् डोळ्यांना तर अंधेरीच आली. माझ्या हातांतलें भरलेलें ताट खळकन् खालीं जमिनीवर पडलें. त्यांतल्या वाट्या न् सगळे पदार्थ चोहोंकडे विसकटले गेले.

पण त्याकडे लक्ष न देतां मी विजेच्या वेगानें पुढें धांवलें. आणि चटकन् सुरेंद्राचा हात धरला!

सुरेंद्राला काय वाटलें कुणास ठाऊक—

तितक्याच जलदीनें त्यानें आपल्या डाव्या हातानें भगवानचा उजवा हात पकडला!

माझ्या तोंडांतून शब्दच निघेना!

तेव्हां सुरेंद्रच म्हणाला, 'आई असं काय करतेस? माझ्या वाढदिवसासारख्या मंगल प्रसंगीं मी दादाच्यापुढं जेवणार आहे!'

'नको.'

'कां?'

'कां? विष आहे त्यांत!' माझ्या वाचेवर माझा ताबाच राहिला नाहीं. चटकन् मी बोलून गेलें.

केवढ्यातरी जोरानें सुरेंद्रानें मला पाठीमागें ढकललें. मागें भिंतीचा आधार मिळाला म्हणून बरें झालें. नाहींतर मी खालीं फरशीवरच धाडकन् आदळलें असतें!

' राक्षसिणी, चांडाळणी !' म्हणून तो मारायला उठला.

भगवाननेंच त्याला आवरला. नाहींतर—

मी मनांत म्हटलें, ' मी राक्षसीण नाहीं. चांडाळीण नाहीं ! एक ' आई ' आहे !'

आणि खरंच मी ' आई ' नव्हते कां ?

आईला न शोभण्यासारखें अधम कृत्य मी काय करीत होतें ?

' असल्या आईजवळ मला क्षणभरही राहायचं नाहीं !' असें म्हणून आपल्या दादाचा हात धरून सुरेंद्र वाड्याबाहेर पडला !

त्याला परत बोलावण्याचा मला धीरच झाला नाहीं. असहाय्यपणें मी भिंतीला मान टेकली. आणि झाल्या प्रकाराचा विचार करूं लागलें. पण मला शांतपणें विचारच करतां येईना. वादळांत सांपडलेल्या नौकेसारखी माझ्या मनाची अवस्था झाली होती. घराच्या कानाकोपऱ्यांतून—चोहोंकडून, ज्याच्यासाठीं मी भगवानला विष घालायला तयार झाले त्या सुरेंद्राचे ' राक्षसिणी, चांडाळणी !' हे शब्द मला पुनः पुन्हां ऐकूं आल्याचा भास होऊं लागला, अन् माझें अंतःकरण अधिकाधिक व्याकुळ होऊं लागलं !

मी मूर्खपणा केला असला तरी तो कोणत्या हेतूनं केला हें बघून तरी सुरेंद्रानं माझ्यावर आग पांखडायला नको होती. पण एवढं कळल्यावर मग कशाला ? भगवानच्या अगोदर तोच अधिक पिसाळला, आणि निघून गेला.

ज्याच्यासाठीं मी जगायचे तो मुलगाच मला सोडून गेल्यावर माझ्या जीवनांत स्वारस्य तें काय राहिलें ! पण त्या स्वारस्याचा विचार करायच्या अगोदर माझं भवितव्य मला स्पष्ट दिसूं लागलं.

सुरेंद्रासारखा हट्टी मुलगा आतां फिरून माझं तोंडसुद्धां पाहणार

नाहीं. अन् मीहून त्याची समजूत करायला जाणें म्हणजे—पिसाळलेल्या वाघाला गोंजारण्याइतकं अवघड काम होतं तें !

तसंच ही गोष्ट बापूसाहेबांना कळली, कीं त्यांचा पारा कुठवर चढेल त्याची तर मला कल्पनाच करतां येईना. भगवान घराबाहेर पडला तरी त्यांनीं त्याचा विषाद मानला नाहीं. ते म्हणत होते, 'एक लहरी मुलगा मला अंतरला असला, तरी माझा शहाणा मुलगा आहे कीं मजजवळ !' आणि हा त्यांचा शहाणा मुलगाहि मी घराबाहेर घालविलेला—

ते मला खाऊं कीं गिळूं करतील !

बाहेर महाराजांच्या मिरवणुकीचीं वाद्यें जोरजोरानें वाजत होतीं, तीं मला ऐकूं आलीं. ही मिरवणूक वाड्यांत पोचली कीं पूजेला सुरवात होणार. आणि पुजेला सुरवात व्हायच्या अगोदर ते सुरेंद्राला बोलावल्यावांचून कधीं रहायचे नाहींत.

तसं बोलावणं आलं तर मी काय उत्तर द्यायचं ?

क्षणभरही त्या घरांत थांबायची माझी इच्छा नव्हती !

ज्या घरांत मी जवळ जवळ सगळा जन्म काढला त्या घरापासून—गांवापासून मला दूर दूर जायचं होतं—माझं दुर्दैव मला बाहेर ढकलीत होतं !

जवळ होते ते पैसे घेऊन मी घराबाहेर पडलें !

बाहेरचं उघडं जग मला भेसूर दिसूं लागलं.

पण माझे पाय पुढेंच पडत होते !

मी स्टेशनवर गेलें, तेव्हां गाडी येऊन उभी राहिली होती. तोंडांत आलें त्या स्टेशनचें नांव सांगून मी तिकीट घेतलें, अन् गाडींत बसलें !

## भगवान : १३ :

दुपारच्या त्या एकंदर प्रकाराबद्दल मला सुखदु:ख तेवढंच वाटलें. कारण स्वार्थानं अंध झालेलीं माणसंच जगांत जिथं सर्वत्र आढळतात, तिथं माईसारख्या एका स्त्रीला दोष देणें म्हणजे—बाभळीच्या झाडाला आंबे लागत नाहींत, म्हणून नाक मुरडण्यासारखेंच नाहीं कां?

पण मला राहून राहून एकाच गोष्टीचं नवल वाटतं! ती म्हणजे, सुरवातीला स्वतंत्र बसलेल्या सुरेंद्राला, माझें ताट पाहिल्याबरोबर माझ्यापुढें बसून जेवायची स्फूर्ति एकदम कां यावी? अन् माईनें त्याचा हात धरल्याबरोबर त्यानें माझा हात कां धरावा? तोपर्यंत मला न् त्याला तरी कुठं ठाऊक होतं—त्या ताटांत विष आहे हें! जेव्हां त्यानें माझा हात धरला आणि माझ्या हातांतला घांस गळून खालीं पडला, तेव्हां मात्र ताटांतलें सगळें अन्न मला काळेकिट्ट दिसूं लागलें!

माझ्यापुढें बसून जेवायची इच्छा आज सुरेंद्राला झाली नसती तर—

तर काय झालं असतं, त्याची कल्पना करण्यांत एकप्रकारची मौजच नाहीं कां आतां ? 'आईचा खून करतो.' 'आईला ठार मारतो.' असें बडबडणाऱ्या सुरेंद्राची समजूत करीत मी इथं बसलोंय ना त्या ऐवजी नदीवरच्या माझ्या चितेकडे पाहात सुरेंद्र रडत बसला असतां !

माईच्या वाड्यांतून बाहेर पडून आश्रमाकडे जातांना झालेल्या प्रकाराची कुठंही वाच्यता करायची नाहीं, असं मी सुरेंद्राकडून वचन घेतलें होतें म्हणून बरें झालें ! नाहींतर त्याचा गांवभर बोभाटा होऊन माईला फारच ताप झाला असता !

आम्हीं आश्रमांत गेलों तेव्हां डॉक्टर नुकते जेवून उठले होते. आम्हाला पाहिल्याबरोबर ते म्हणाले, 'सुरेंद्र, मी तुझें अभिनंदन करतों !'

सुरेंद्राचे डोळे पाण्यानें भरल्याचा मला भास झाला. तें डॉक्टरांच्या लक्षांत येऊं नये म्हणून मीच पुढं होऊन म्हटलें, 'या खुळ्या पोराचं कसलं अभिनंदन करता ?'

'कां बापूंचा तर तो शहाणा मुलगा आहे !'

'होता ! पण आज गुण उधळले कीं यानें ! बापू, सत्यनारायणाला चल म्हणत होते; हा गेला नाहीं. मग बापू जेव्हां रागावले–स्वारी नरमली तेव्हांच !'

या सगळ्या बनावट माहितीनें सुरेंद्राची कळी चांगलीच उमलली. तो हंसत म्हणाला, 'तर तर, नरमतोय ! अन् बापूंचं ऐकलं नाहीं म्हणून मी खुळा काय ? तूं मात्र अगदीं शहाणा, पंडीत !'

'शहाणा पंडीत!' हे शब्द त्यानें ज्या आविर्भावानें उच्चारले ते ऐकून डॉक्टर खो खो हंसू लागले!

सुरेंद्राला मानसिक ताप अधिक होऊं नये म्हणून मी त्याला माझ्या खोलींत नेऊन झोंपविलें. आणि मी डॉक्टरबरोबर रोग्यांच्या चौकशीसाठीं निघालों. पण रोग्याशिवाय आम्हांला इतर माणूस एकही भेटला नाहीं. झाडून सारे लोक नारायण महाराजांच्या दर्श-नाला गेले होते. संध्याकाळच्या सुमारास ते सगळे परत आले. एवढ्या मोठ्या महात्म्याच्या दर्शनानें आज आपणांला एकवेळ पोटभर जेवायला तरी मिळेल, या आशेनें बिचारे संध्याकाळपर्यंत तिष्ठत बसले. पण ज्या महात्म्याला केडगांवपासून बोरगांवपर्यंत यायला हजार रुपये लागतात, त्याला या गरिबांच्या आशा, आकांक्षा कळणंच शक्य नाहीं! बापूंनीं या सत्यनारायणासाठीं दोनअडीच हजार रुपयेपर्यंत खर्च केला म्हणे! या सत्यनारायणांत गांवांतल्या झाडून साऱ्या पांढरपेशांनीं आणि आठ आणे रुपाया दक्षिणेसह साऱ्या भटांनीं आपली ढेरपोटें भरून घेतलीं असतील! पण या बिचाऱ्या शेतकऱ्यांना व मजुरांना चिमुटभर प्रसादावरच आपल्या झोंपडीचा रस्ता धरावा लागला! यांचीं तळमळणारीं पोटें त्या महा-त्म्याला, बापूंना निदान त्या दयाघन सत्यनारायणाला तरी दिसा-यचीं होतीं. पण त्याला डोळे असते तर आजपर्यंत चाललेली यांच्या पोटांची तळमळ त्याला दिसली नसती कां?

त्यांतल्या एका मजुरानें मला सांगितलें, कीं 'तारामाई, दुपारीं एकाएकी नाहींशा झाल्यात. सगळीकडं शोधाशोध चाललीय!'

त्या बातमीवर माझा विश्वासच बसेना. तरीपण मी लगेंच सुरेंद्राकडे आलों. ती बातमी त्याला सांगायला नव्हे तर ती

शक्यतों त्याला कळूं नये अन् त्याचा मनस्ताप अधिक वाढूं नये याची खबरदारी घ्यायला !

सुरेंद्र कांहींतरी लिहित होता. मला पाहिल्याबरोबर त्यानें लिहिणें बंद केलें आणि आईकडून आलेलें प्रसादाचें पातेलें मला दाखविलें. त्याच्याबरोबर मी कसेंबसें दोन घांस खाल्ले. आणि बाकीचा सगळा प्रसाद सर्वांना वाटण्यासाठीं दादूजवळ दिला !

त्यावर मी खोलीबाहेर पडलों नाहीं. सुरेंद्र फारसा बोलत नव्हता ! अन् माझ्या मनांतल्या विचारामुळें मीहि फारसें बोललों नाहीं ! झोंपायच्या वेळेस सुरेंद्र आपला बिछाना खालीं टाकूं लागला. मी त्याला सगितलें, ' तें कांहीं नाहीं. तूं इथं काटवर माझ्याजवळ झोंपलं पाहिजेस ! ' तरीहि तो येईना. मग मी ओढूनच त्याला वर घेतला. आणि एकाद्या लहान मुलासारखें त्याच्या मस्तकाला थोपटलें ! त्यानें डोळे झाकल्यासारखे मला दिसले. पण माझा डोळा मात्र अजिबात लागेना ! माझ्या मनापुढें एकच प्रश्न सारखा नाचत होता,

' माई कुठं गेल्या असतील ? '

  

सकाळीं मी जागा झालों, तेव्हां सुरेंद्र माझेजवळ नव्हता !

नकळत माझी नजर त्याच्या वस्तूंकडे गेली. त्याचा कोट नव्हता. टोपीही नव्हती. माझ्या पोटांत धस्स झालें !

मी चटकन् बाहेर गेलों. डॉक्टरना, सुभद्रेला विचारलें. सगळ्या आश्रमांत चवकशी केली. गांवांत चवकशी करायला माणसें पाठविलीं. पण सुरेंद्राचा कुठेंच पत्ता लागेना. माझी

स्थिति अगदीं वेड्यासारखी झाली. माई कुठं गेल्या असतील, या विचारानें मी रात्रभर तळमळत होतों. त्या अतिविचारानें मला गाढ झोंप लागली. अन् त्या झोपेनेंच दगा दिला होता! सुरेंद्राचा हा नाहींसा होण्याचा विचार कालपासूनच चालला असला पाहिजे. रात्री खालीं निजण्याचा त्यानें हट्ट घेतला त्याचें कारण दुसरें तिसरें काय असणार ?

माई कुठं गेल्या असतील, याचा विचार करतांना मला सारखं वाटत होतं, त्यांनीं जीव तर दिला नसेल ? सुरेंद्र अस कांहीं करणार नाहीं, याची मला खात्री वाटत होती. पण विचाराच्या भरांत माणूस वेडा होतो, त्या वेडांत तो काय करील त्याचा नेम आहे कां ? आणि अशा विचारांनीं माझ्या जिवाची तळमळ होऊं लागली. ती तळमळ शांत करण्याचा उपाय मात्र मला एकही सुचत नव्हता !

सचिंत मुद्रेनें मी व्हरांड्यांतच बसलों होतों. माझ्या भोंवतीं बसलेल्या माणसांच्या अनेक कल्पना निघत होत्या. 'कॉलेजांत गेले असतील.' 'कांग्रेसच्या चळवळींत शिरले असतील.' 'इथंच कुठं-तरी बसले असतील.' एक ना दोन. कांहीं न बोलतां मी तें सगळं ऐकून घेत होतों. शेवटीं त्यांनीं एका देवऋष्याला आणला. त्यानें मारे हातवारे करून सागितलें, 'इथंच आसपास आहे. आज संध्या-काळपर्यंत किंवा उद्यांपर्यंत आपोआप येईल. कांहीं काळजी करूं नका.'

क्षणभर मला केवढा तरी हुरूप आला !

माझं मलाच आश्चर्य वाटलें. इतर वेळीं प्रत्यक्ष देवानं जरी मला भविष्य सांगण्याचा प्रयत्न केला असतां तरी त्याच्यावर माझा विश्वास बसला नसता. पण माझ्या मनाच्या विकल अवस्थेंत या

देवकृष्यानें विजय मिळविला होता ! मी त्याला माईबद्दल विचारलें.

त्यालाही बराच धीर आला होता आतां. तो म्हणाला,

‘ त्यांची कशाला वाट बघतां ? त्यांनीं आपला रस्ता केव्हांच सुधारलाय ! ’

तोच रस्ता त्याला दाखविण्याइतका मला त्याचा राग आला !

तितक्यांत सुभद्रेनें एक पत्र मला दिलें. तें तिला माझ्या टेबलावर सांपडलें होतें. काल मी बाहेरून आलों तेव्हां सुरेंद्र लिहीत होता. त्याची मला आठवण झाली. त्याचवेळीं ‘ मी काय लिहितोयस् ?’ म्हणून चवकशी केली असती तर —? पण आतां काय उपयोग ? पत्र सुरेंद्राचंच होतं ! तेव्हां सर्वजण म्हणाले, ‘ मोठ्यानें वाचा. ’

मी वाचूं लागलों,

‘ प्रिय दादा,

मी असा एकाएकी नाहींसा झालों, म्हणून दुःख करूं नकोस. तुला असं दुःख देतांना, माझ्या मनाला काय कमी वेदना होतात ? पण त्या सगळ्या सहन करून मी हा मार्ग पत्करीत आहे.

काल आईनं तुझ्यावर विषप्रयोग केला. तुला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. पण त्या आईचे राईराईएवढे तुकडे करण्याइतका मी बेफाम झालों होतों. तूंच आवरलंस म्हणून ···! नाहींतर मी काय केलं असतं तें माझं मलासुद्धां कळलें नसतें !

कोल्हापुराहून आल्यापासून मी पाहतोंय, आईनं सारखा बापूंच्यामागं तगादा लावला होता, कीं सगळी इस्टेट सुरेंद्राच्या नांवची करा म्हणून. बापूही तयार होते. मी तयार नव्हतों म्हणूनच तें काम पडलें होतें.

आज आईनं तुला विष घातलं. तो प्रयत्न हुकला. आतां मी इथं राहिलों तर ती मला न विचारतांच सगळी इस्टेट माझ्या नांवची करायला बापूंना भाग पाडील! पण मीच इथनं नाहींसा झाल्यावर तसं कांहींच होणं शक्य नाहीं!

दादा,

मी एकदां म्हणालों होतों, ' मी माझ्या दादापासून क्षणभरही दूर राहाणार नाहीं!' तें खोटं नव्हतं. पण ज्या दादावर मी एवढं अलोट प्रेम केलं त्याच्या दुःखावर उभारलेलं सुख मला नको होतं! म्हणून हा त्याग मला करावा लागत आहे! याबद्दल मला क्षमा करशील ना?

एका बदमाष आईच्या पोटीं कलंकित जन्म घेऊन तुझ्या-सारख्या दादाला आणि यशोदाआईसारख्या प्रेमळ आईला अंतरण्यापेक्षां माझा जन्मच झाला नसता, किंवा मी तुझा लहान भाऊ — असा नव्हे अगदीं सख्खा— झालों असतों तर—'

पण एवढं भाग्य माझं कुठून असणार!

पुढं कुठं जाणार नि काय करणार, हें माझं मलाच माहीत नाहीं! पण मी कांहीं केलं तर त्याचा प्रकाश तुझ्यापर्यंत खचित येईल. त्या प्रकाशांतच पुन्हां आपली भेट होईल! आणि असा प्रकाश नाहीं पडला तर......

जगांतल्या अंधारांत मी कुठं गडप होईन तें मला कळायचं नाहीं. अन् तुला समजायचंही नाहीं!'

तुझा लाडका
सुरेंद्र, '

माझे डोळे भरून आले. सुभद्रेला तर रडूंच कोसळलें.

दोन जिवांच्या दोन तऱ्हा झाल्या ! माझ्या दृष्टीनें माई कितीही वाईट असली तरी ती प्रेमळ माता होती. आपल्या मुलाला इस्टेट मिळावी असं तिला वाटणं स्वाभाविक होतं. आणि सुरेंद्र तर काय बोलून चालून त्यागाचा पुतळा होता. एवढी इस्टेट मिळत असूनही त्याला तिचा मोह नाहीं. दुसरा एकादा असता तर त्यानें माझा खून करायला देखील कमी केले नसते ! अन् असं होतं तरी आज या दोन निरपराधी जिवांना परागंदा व्हावं लागत आहे, याचा मला अर्थंच कळेना. माई कुठं गेल्या असतील हें कळायला कांहींच मार्ग नव्हता. आणि सुरेंद्रानें पत्र ठेवलें होतें तरी त्यावरून त्याचाहि पत्ता कळण्यासारखा नव्हता.

यांचा शोध कोठें आणि कसा लागणार ?

माझं मन कसं सुन्न होऊन गेलं होतं. मी खोलींत गेलों. त्यावर आणखी एक आघात झाला !

टपालांत पद्माचें पत्र होतें. आठ दिवसांपूर्वी, आईला बरं असल्याचें तिचें पत्र आलें होतें. त्यावर गेलेल्या माझ्या पत्राचें हें उत्तर असणार ! म्हणून तें वाचण्याची मला तितकीशी आतुरता नव्हती ! पण बॉम्बगोळा पडला म्हणजे निवांत घरालासुद्धां हादरा बसतो. पत्र छोटेंच होतें. पण त्यानें माझ्या हृदयाची शतशः शकलें करून ती दूर दूर भिरकावल्याचा मला भास झाला.

तिनें लिहिलें होतें,

' भिंत, डोंगर, दरी आणि अफाट सागर जरी आडवा आला असतां तरी माझें प्रेम तुमच्याकडेच धावलें असतें. पण याच प्रभावी प्रेमाला आज एक लहानसा ओढासुद्धां ओलांडता

येऊं नये हें नवलच नाहीं कां? माझ्या अशा लिहिण्यानें तुमच्या हृदयाला जबरदस्त धक्का बसेल याची मला पुरी कल्पना आहे. पण या अशा धक्क्यानें तरी तुम्ही माझ्यापासून दूर व्हावं एवढीच माझी इच्छा आहे!

तुम्ही म्हणाल, हिला वेड तर लागलं नाहीं? मला वेड लागलं असतं तर किती चांगलं झालं असतं! प्रीतिसाफल्याचं थोडंसुद्धां सुख भोगलं नाहीं तोंच प्रीतिविध्वंसाचें जें दुःख माझ्या नशिबीं आलं, त्यांतून तरी मी मुक्त झाले असतें! पण हवं तें कधीं मिळतं कां या जगात?

आपल्या आवडत्या देवाला पायदळीं पडलेलं फूल वाहिलं गेलं आणि तें देवाला कळणार नसलं तरी भक्त तें तेव्हांच बाजूला टाकतो. त्याच्या अशा करण्यानें त्याची देवावरची खरी भक्तीच सिद्ध होते! मीही तेच करीत आहे. आपण एका बड्या जमीनदाराचे चिरंजीव आहात. आणि मी...... मी एका पतितेची मुलगी आहे! माझ्या सारखीनं आपल्यावर प्रेम करणें म्हणजे मखमलीनें सूर्याशीं संबंध जोडण्यासारखें आहे! आईनें मला वेळींच सावध केलें, याबद्दल तिचे आभार मानूनच मी आपणांला लिहित आहें! हे पत्र म्हणजे आपली शेवटची भेट समजा. अन् कृपा करून या अभागी पोरीला विसरून जा!'

'विसरून जा!' माणसाला वाटेल ती वस्तु विसरतां येईल—आपला देहसुद्धां! पण स्वतःचा प्राण त्याला कधींतरी विसरतां येईल काय? पद्मा म्हणजे माझा प्राण होता! या प्राणाला मी कसा विसरूं? [illegible] नुसत्या कल्पनेंनेंच माझं हृदय व्याकुळ झालें!

पण ती व्याकुळता टिकूं देणें हा माझा धर्म नव्हता. मी मनाशीं

म्हटलें, 'पद्मानं कांहीं जरी लिहिलं असलं तरी तिला ओढून आणण्याची शक्ति जोंपर्यंत माझ्यांत आहे, तोंपर्यंत मी कशाचीही फिकीर करणार नाहीं!' मी तें पत्र बाजूला सारलं. तरी मनाची रुखरुख कांहीं थांबेना. तिच्या आईनें तिला काय सांगितलं, त्याचा तिनें मुळींच खुलासा केला नव्हता. तें तिच्या जिवाला लागण्यासारखें असलें, आणि तिनें आपल्या जिवाचें कांहीं बरं वाईट केलें तर...? आतांच तिला पत्र लिहून तात्बडतोब बोलावून घ्यावें असें मला वाटलें. मी कागद घेतला. अन् लिहूं लागलों.

तोंच डॉक्टरनीं बाहेर हांक मारली. मी जायला ऊठलों.

माझ्यासमोरच्या कागदांवर फक्त दोनच अक्षरें नाचत होतीं.

'पद्मा, पद्मा, पद्मा!'

काय लिहावं याचा विचार करतांना, माझ्या हातांनीं केलेला चाळा होता तो. डॉक्टरांच्याकडे लोकांनीं एक मरणोन्मुख रोगी आणला होता. तो मला दाखवित डॉक्टर म्हणाले, 'याला औषध हवंय!'

'मग द्याना.'

'माझ्या औषधाचा उपयोग नाहीं, तूं दे.'

मला त्यांच्या बोलण्याचा अर्थच कळेना. मी म्हटलें,

'मी कसलं औषध देऊं?'

'जगण्याचं!'

'कसला रोग झालाय याला?'

'उपासमारी! बरेच दिवस हा उपाशी असला पाहिजे. आपल्या झोपडींत हा गार होऊन पडला होता, म्हणून या लोकांनीं याला इकडे आणला. पण याला कांहींसुद्धां रोग नाहीं. थोडथोडं अन्न देणें हेंच याचें औषध!'

माझ्या डोळ्यांपुढें उपाशी लोकांचे मलूल चेहरेच दिसूं लागले सगळे. आतांपर्यंत यांचा प्लेग हटविण्याचा प्रयत्न केला; प्लेगचें मानहि पुष्कळच कमी आलंय. पण या उपासमारीच्या साथीवर आतां काय उपाय करायचे ? पांच पन्नास रुपयांचे औषध आणून आतां थोडंच भागणार आहे ? याला उपाय एकच होता—धान्याचीं पेवं मोकळीं करून या लोकांना वाटणें !

सगळ्या लोकांना मी एकत्र बोलावलं आणि त्यांना बरोबर घेऊन धान्य मागण्यासाठीं बापूंच्या वाड्यावर जायचें ठरविलें.

त्यांच्या शेतांतून सोनं पिकविणाऱ्या या लोकांना जगवणं हें बापूंचं कर्तव्य आहे ! त्यांनीं या लोकांना धान्य दिलंच पाहिजे ! वाटल्यास तें फुकट द्यावं किंवा आपलं कसलंही काम करून त्याची मजुरी म्हणून द्यावं. या गोष्टी त्यांनीं कबूल केल्या तर ठीक ! नाहीं तर सगळ्या लोकांसह मी तिथं धरणं धरून बसेन अगर सत्याग्रह करीन !

आणि यालाही त्यांनीं जुमानलं नाहीं तर काय करायचं तेंही मी ठरवून टाकलं आहे—

जें मागून मिळत नाहीं तें हिसकावूनच घेतलें पाहिजे !!

---

## यशोदा

## : १४ :

सुरेंद्रासाठीं न् तारेसाठीं मी रात्रभर तळमळत होतें. कांहीं कारण नसतां तारेनं हें घर सोडावं अन् सुरेंद्रानेंही तिच्यामागं एकाएकी नाहींसं व्हावं, या दुःखद घटनेनं मला काल दिवसभर जेवणदेखील गेलं नाहीं. त्यांची स्थिति तर अगदीं खुळ्यासारखी झाली आहे. त्या सत्यनारायणाच्या गोंधळांतच तारेची बातमी समजली होती. पण त्यावेळींच कळलं होतं, कीं सुरेंद्र आश्रमांत आहे! तारेच्या बातमी-मुळें त्यांना जें अनावर दुःख झालं तें सुरेंद्र आहे असं कळल्यामुळें कांहींसं कमी झालं होतं. कारण त्यावेळीं ते म्हणाले होते, 'सुरेंद्र आहे ना ठीक.!' पण दुसरे दिवशीं हे आश्रमांत जायच्या आगो-दर सुरेंद्र नाहींसा झाल्याची बातमी आम्हाला कळली!

त्यावेळीं हे चहा पीत होते. ती बातमी कळल्याबरोबर हे केवढ्यानें तरी दचकले! त्यांच्या भरलेल्या बशींतला चहा बशीसकट खालीं पडला! त्यावर त्यांना जेवणदेखील धड गेलं नाहीं. आणि दिवसभर ते

वेड्यासारखेंच वागले! तीनतीनदां ते तारेच्या वाड्याकडे जात नि उदासवाण्या चेहऱ्यानें परत येत. अन् आपल्या दिवाणखान्यांत तासन्तास वर दृष्टि लावून बसत! जणु वरच्या छतांत त्यांना सुरेंद्र व तारा यांच्या मूर्तीच दिसत होत्या. दुपारच्या वेळीं ते एकदां झोंपले. पण पांच मिनिटांत ते ' सुरेंद्र, तारा ! ' असा करुण उद्गार काढीत जागे झाले. मला त्यांचा तो उद्गार खालीं माजघरांत ऐकूं आला. मी वर गेलें. मला पाहिल्याबरोबर त्यांनीं विचारलं, ' तारा आली? सुरेंद्र आला ? '

मी म्हटलं, ' असं काय वेड्यासारखं करतां ? आज ना उद्यां त्यांचा खचित शोध लागेल ! '

' लागेल ? खरं म्हणतां ? '

' नक्कीच. आतां स्वस्थ पडा बघूं ! '

तरीही त्यांना स्वस्थता मिळाली नाहीं. चारच्या सुमारास ते स्वतःशींच बडबडूं लागले, ' तारे, काय केलंस हें ? तुझ्यावर कोणतं संकट आलं म्हणून तूं हा मार्ग पत्करलास ? इतक्या दिवसानंतरही माझं मन तुला कळलं नाहीं ? तूं मला सगळं समजावून सांगितलं असतंस तर मी तुझ्यासाठीं काय वाटेल तें केलं असतं! पण तूं आतां या निर्दय जगांत कुठं जाणार, नि काय करणार ? निदान भरपूर पैसे तरी न्यायचे होतेस! मी कष्ट करून जो संपत्तिचा एवढा ढीग सांठविला नि वाडेहुडे बांधले ते काय माझ्यासाठीं ? तुझ्या सुरेंद्रासाठीं न् भगवानसाठींच मी हें केलें! पण तूं निघून गेलीस, सुरेंद्र नाहींसा झाला आणि भगवान माथेफिरू निघाला! मी आतां या संपत्तिचं करूं तरी काय ? तारे, सुरेंद्रासह असशील तेथून निघून ये. देवा, मी काय करूं आतां ? '

त्यांनीं असहाय्यपणें टेबलावर मान टेकली असावी. एक अस्पष्ट हुंदकाही ऐकूं आला! मला भडभडून आलं! नकळत माझा हात डोळ्याकडे गेला. माझे डोळे पाण्यानें भरले होते. त्यांच्या कोमल हृदयाची ती तळमळ ऐकून माझा गळा दाटून आला होता.

मी आंत गेलें न् म्हटलें,

‘ पुन्हां तुम्ही बडबडायला लागला ! ’

‘ ही बडबड नाहीं. मला असह्य होणारी तळमळ आहे ! ’

‘ पण या तळमळीनें काय होणार ? ’

‘ मग काय करूं, तुम्हींच सांगा ! ’

‘ भगवानला बोलवूं कां ? ’

‘ त्या माथेफिरूला ? ’

क्षणांत कोमल हृदयाचा फत्तर झाल्याचा मला भास झाला!

पुष्कळ विचार करूनही मला कळेना—

सुरेंद्र गेला म्हणून रडत बसणाऱ्या यांच्या हृदयाचं, भगवानशीं कां पटूं नये? भगवानबद्दल यांच्या मनांत एवढी अढी कां असावी?

तारा, सुरेंद्र नाहींसा झाल्याची बातमी कळली तेव्हां क्षणभर मला वाटलं होतं, आतांतरी हे भगवानशीं सरळ वागतील! पण त्या समाधानाबद्दल माझा मलाच राग आला होता. तें समाधान मी क्षणभरही मनांत टिकूं दिलं नव्हतं! सुरेंद्र, ताराला घालवून यांनीं भगवानवर प्रेम करण्याची मी अपेक्षा करणें म्हणजे—दुसऱ्याचं घर जाळून त्यावर स्वतःची पोळी भाजण्यासारखेंच निष्ठुरपणाचें होतें. म्हणून ह्यांनीं भगवानला माथेफिरू म्हटलें तरी त्याबद्दल मला राग आला नाहीं, विषाद वाटला नाहीं, कीं त्यावर मी विचार

करीत बसलें नाहीं. तारा नि सुरेंद्र यांच्या नाहींशा होण्यामुळेंच मी रात्रभर तळमळत होतें !

सकाळीं माझं मन अगदीं विषण्ण झालं होतं. डोळे चुरचुरत होते. आणि कांहीं करायला उत्साहच वाटत नव्हता. त्याचवेळीं रस्त्यावर भगवानच्या नांवाचा जयजयकार चाललेला मला ऐकूं आला. मी खिडकींतून बाहेर पाहिलें.

दोन अडीचशें लोकांच्या जमावासह भगवान आमच्या वाड्या-कडेच येत होता. भगवानबरोबर सुभद्राही होती ! अन् तिच्या हातांतलें तें निशाण—त्यावरचा तो हातोडा न् कोयता मला स्पष्ट दिसला. त्या लोकांनीं तर भगवानच्या नांवाचा सारखा जयघोष चालविला होता !

स्वत:च्या मुलाचा जयजयकार चाललेला ऐकून कोणत्या मातेच्या मनावर कौतुकाची धुंदी चढणार नाहीं? पण मीच याला अपवाद ठरलें ! भगवानचें कौतुक वाटण्याऐवजीं, इतक्या लोकांना घेऊन तो कां आला आणि काय करणार आहे ? या विचारानं माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला ! ह्यांनीं भगवानच्या थोबाडींत मार-ल्याचा तो प्रसंग माझ्या डोळ्यापुढें ताजा दिसत होता. त्यानंतर भगवाननं सरळ सरळ शेतकऱ्यांची बाजू धरली, त्यांना वाड्याच्या कामावर फुकट राबूं दिलं नाहीं, प्लेगच्या कहरांत घरोघर फिरून त्यांना मदत केली आणि यांनीं घातलेले मारेकरीही त्यानें पिटाळून लावले. या गोष्टी जसजशा भगवानकडून घडल्या गेल्या तसतशी यांच्या तळपायाची आग मस्तकाला गेली होती. आज भगवान कांहीं कमीजास्त बोलला तर हे काय करतील याचा नेम नव्हता.

तारेसाठीं न् सुरेंद्रासाठीं वेडं होणारं यांचं हृदय, शेतकरी अन्

भगवान म्हटलें, कीं दगडापेक्षां कठीण होतं! घरीं धान्याचीं पेवं भरलेलीं आहेत, पण यांना शेतकऱ्यांची उपासमार कांहीं दिसत नाहीं! यांना वाटतं, माझीं पेवं कुजून गेलीं तरी हरकत नाहीं. पण माझं न ऐकतां माझा अपमान करणाऱ्या शेतकऱ्यांना मी एक दाणासुद्धां देणार नाहीं! भगवानाचं म्हणणं, बाराही महिने आपल्या जमिनींत कष्ट उपसणाऱ्या शेतकऱ्यांना यावेळीं जगविणं हें आपलं कर्तव्यच ठरतं! त्याचे वडील म्हणणार, हें कर्तव्य मी जाणत नाहीं! भगवानचं उत्तर, तुम्हीं जाणलं नाहीं, तरी तुम्हाला तें मी करायला लावीन!

त्यानें तें करायला लावायचें म्हणजे—आगींत तेल ओंतून त्याचा भडका उडवायचा! अन् त्या भडक्यांत......काय होईल त्याची कल्पनाच मला करवेना! त्या भेसूर कल्पनेच्या नुसत्या विचारानें माझ्या डोळ्यांना अंधेरी आली! नकळत माझे हात जोडले गेले. आणि मी परमेश्वराला म्हटलें, ‘ देवा, यावेळीं त्यांना सुबुद्धि दे. गरीब शेतकऱ्यांसाठीं थोडीतरी झीज सोसण्याचा विचार त्यांच्या मनांत येऊं दे! ’

एवढेंच करणें माझ्या हातीं होतें!

मी बाहेर आलें, तों सगळें लोक दरवाजासमोर येऊन थांबले होते. निशाण घेऊन सुभद्रा दरवाजांत उभी होती. अन् भगवान आंत येऊन उभा राहिला होता. गड्याला सांगून त्यानें दिवाणजींना खालीं बोलावून घेतलें अन् विचारलें, ‘ बापू आहेत ? ’

‘ हो. ’

‘ भेट होईल ना त्यांची ? ’

दिवाणजींनीं वरून विचारून येऊन सांगितलें, ‘ नाहीं! ’

'कां?' म्हणून धाडधाड जिना चढत भगवान वर गेला. माझा जीव खालींवर होऊं लागला!

भगवाननें दिवाणखान्यांत पाय टाकला असेल नसेल तोंच ते मोठ्यानें ओरडले, 'भगवान, चालता हो परत! तुला भेटण्याची माझी इच्छा नाहीं!'

'तुमचा मुलगा म्हणून भेटूं नका!'

'मग काय, बंडखोर म्हणून भेटूं?'

'मी बंडखोर नाहीं. खालीं तीनशे लोक उभे राहिलेत त्यांचा मी शिपाई आहे! मला राहिलं. त्या लोकांना तरी भेटा.'

'काय म्हणणं आहे त्यांचं?'

'पोटाला मागताहेत!'

'त्यांना पोटाला देऊन, आम्ही काय बिब्बे घालायचे!'

'तुमच्या पोटाला लागेल तें ठेवून घ्या; बाकीचं त्यांना द्या!'

'पण काय म्हणून?'

'तुम्ही मालक आहांत त्यांचे!'

'मालक असणं हा कांहीं गुन्हा नाहीं!'

'गुन्हा असो अगर नसो—पण त्यांना पोटाला देणं हें तुमचं कर्तव्य आहे! मग तें त्यांना फुकट द्या किंवा त्यांच्याकडून काम करून घेऊन त्यांची मजुरी म्हणून द्या. पण कांहींतरी तुम्हीं केलंच पाहिजे!'

'कांहीं करणार नाहीं! सुरेंद्राला घालवलास म्हणून मी तुझं ऐकेन असं वाटलं कीं काय तुला?'

'सुरेंद्राला मी घालवला?'

‘ हो तूं घालवलास. त्याच्या नांवची मी इस्टेट करणार हें कळल्यामुळें त्याला तूं घालवलास—मारलास ! ’

सुरेंद्राला नाहींसा करणं किंवा मारणं हें भगवानच्या हातून कधीं तरी होईल कां ? रामाच्या हातून लक्ष्मणाचा खून झाला असता ! पण ही गोष्ट शक्य नाहीं. तरीही ते फाडफाड बोलत होते. तसं बोलतांना त्यांच्या मनाला कांहींच वाटत नव्हतें !

भगवानच्या हृदयाला मात्र त्या शब्दांनीं घरें पडलीं असतील ! पण त्याचा अस्पष्ट उल्लेखदेखील त्याच्या शब्दांत दिसला नाहीं. तो म्हणाला, ‘ मग, हे लोक इथनं हलायचे नाहींत ! ’

‘ काय वाटेल तें करूं देत ! त्यांनीं इथं प्राण दिला तरी मी डरणार नाहीं. मीही तितकाच खंबीर आहे ! ’

त्यावर कांहींच न बोलतां भगवान सावकाश खालीं आला. अन् त्यानें त्या सगळ्या लोकांना सांगितलें, ‘ बापूसाहेब आपलं कांहीं ऐकायला तयार नाहींत. अर्थात् आपलें ठरल्याप्रमाणें आतां इथनं न हलणं हाच एक उपाय आहे ! ’

लोकांतून ‘ ठीक, ठीक ’ हा शब्द उठला. आणि तिथं रस्त्यावरच सगळे लोक खालीं बसले ! पण माझ्या मनापुढें एक काळजीचा प्रश्न उभा होता, हे लोक इथं बसून राहिले ! पुढें काय होणार ?

## सुभद्रा : १५ :

‘ पुढें काय होणार ? ’

मला नाहीं आवडला हा बाबांचा प्रश्न. मी रागानेंच म्हटलं, ‘ काय होईल ? मरण येईल एवढंच ना ? पण आपलं जीवन म्हणजेच जिथं रोजचं मरण आहे, तिथं या एका दिवसाच्या मरणाची भीति ती काय ? ’

पण बाबांना कांहीं तें पटलं नाहीं ! त्यांचं म्हणणं एकच होतं, ‘ इतक्या लोकांचा मोर्चा न नेतां एकदोघांनीं जाऊन बापूंना विचारून यावं ! इतकी घाई करूं नये. जरा धीरानं घ्यावं ! ’

त्यावर रावसाहेब म्हणाले, ‘ धीरानं म्हणजे केव्हां ? सगळीं माणसं उपासमारीनं मेल्यावर ? तें कांहीं नाहीं मी सगळ्या लोकांना नेणार ! अन् सत्याग्रह करणार, धरणं धरून बसणार अन् शेवटीं लुटालूटसुद्धां ! ’

ते ऐकून बाबा चमकले. पण मी केवढ्यातरी अभिमानानें रावसाहेबांच्या चेहऱ्याकडे पाहिलें. त्यांच्या करारी मुद्रेवर आणि पाणीदार डोळ्यांत निश्चयाचें तेज चमकत होतें. संवयीप्रमाणें त्यांनीं उजव्या हातानं केसांचे झुपके मागें सारले, तेव्हां त्यांचं मोकळं झालेलं तें उंच कपाळ जणुं त्यांच्या कर्तृत्वाची पताकाच होती ती.

त्यानंतर सगळ्या लोकांना आपण काय करायचं आहे याची माहिती दिली. आणि काल सकाळीं त्या सगळ्यांच्या अग्रभागीं राव-साहेबाबरोबर हातांत निशाण घेऊन मी चालूं लागलें, तेव्हां माझ्या आंगावर आनंदाचे रोमांच उभे राहिले! त्या आनंदांत मला एका-एकी हंबीरची आठवण झाली. माझ्या मनाला वाटलं, यावेळीं हंबीर मोकळा असायला हवा होता ! त्याचा आनंद गगनांत मावला नसता!

बाबा अन् डॉक्टर जें नरमाईचं धोरण ठेवतात, त्यांच्यापेक्षां रावसाहेबांची चढाई असते. पण तेही कांहीं प्रसंगीं जें नमतं घेतात तें हंबीरला कधींच पसंत पडलं नसतं ! कालचंच पहा कीं ! बापू-साहेबांनीं 'कांहीं देत नाहीं' म्हणतांच रावसाहेबांनीं धरणं धरून बसायला सांगितलं. पण हंबीरनं असं कांहीं न करतां सरळ पेव उकरायला सुरवात केली असती !

आणि रावसाहेबांना असं कांहीं करतां येत नाहीं, असं थोडंच आहे ? पण त्यांच्या प्रत्येक कृतिमागें पूर्ण विचाराची तटबंदी असते. हंबीरला मात्र हें जमत नाहीं. तो पुष्कळ विचार करतो, वाचन करतो आणि तोंडानं मोठमोठीं तत्त्वं बोलतो; पण त्याच्या आंगां-तला हुमदांडगेपणा कांहीं केल्या जात नाहीं !

म्हणून तो आज इथं नाहीं हेंच बरं झालं असं वाटतं !

कालपासून हा सत्याग्रह कसा व्यवस्थित नि शांतपणें चाललाय!

कुणी भूक म्हणत नाहीं, तहान म्हणत नाहीं. ज्या ठिकाणीं काल सकाळीं बसले त्या ठिकाणाहून चोवीस तासांत कित्येकजण जरादेखील हलले नाहींत ! जणूं तपाला बसलेले ऋषीच !

काल तिसऱ्या प्रहरीं आईनीं रावसाहेबांना कॉफी घेण्याबद्दल केवढातरी आग्रह केला. सगळ्या लोकांनाही कांहींतरी खायला देण्याची इच्छा दाखविली. पण त्यांनीं पाण्याचा घोटसुद्धां घेतला नाहीं. अन् कुणाला कांहीं देऊंही दिलं नाहीं ! सगळ्या लोकांत ते हंसतमुखानें फिरत असतात, बोलत असतात !

मी तर चोवीस तास या निशाणाजवळ उभी राहिलेय. पण माझे पाय दुखत नाहींत, शरीराला थकवा आल्यासारखें वाटत नाहीं ! उलट मनाला एक प्रकारचा उत्साहच वाटतोय ! अन् याचंच मला नवल वाटतं ! एखादे वेळ जेवण चुकलं तर माझा जीव कासावीस होत असे. पण आतां ? कुठून तरी माझ्या शरीरांत अलोट शक्ति संचरल्याचा मला भास होतोय ! ही शक्ति कुठून आली ?

न कळत माझी दृष्टि रावसाहेबांवर खिळली !

संध्याकाळीं ते मजजवळ येऊन म्हणाले, 'सुभद्रा, तुझे पाय दुखत असतील !'

'मी काय मेणाची बाहुली नाहीं !'

'म्हणूनच तुला विसांवा हवा. तूं खालीं बैस. मी धरतों निशाण !'

'इतक्या लवकर आपल्या वचनाला विसरलात कां ?'

'कसलं वचन ?'

'सुरवातीला तुम्ही मला सांगितलं होतं, हें निशाण अखेरपर्यंत तुझ्याच हातांत राहील ! अन् आठदहा तास झाले नाहींत, तोंच तुम्ही तें परत मागूं लागलात. पण मला मिळालेला अधिकार मी

इतक्या लवकर सोडायला मुळींच तयार नाहीं!'

हंसत हंसत ते माझ्यापासून दूर गेले.

ø ø ø ø

आज दुसरा दिवस उजाडला, तरी लोकांची शांतता ढळली नाहीं. अन् बापूसाहेबांची बुद्धिही वळली नाहीं! एवढें लोक इथं रस्त्यांत उपाशी बसलेत, पण ते जणु त्यांच्या खिसगणतींतच नाहींत! त्यांचे रोजचे कार्यक्रम कसे व्यवस्थित चालू आहेत; आंघोळ, चहा, देवपूजा, जेवण सर्व कांहीं! पण ते बाहेर मात्र अजिबात येत नाहींत!

त्यांनीं असंच चालविलं तर...?

तर—

माझ्या डोळ्यांपुढें किती भेसूर देखावा दिसूं लागला. हे रस्त्यावर बसलेले लोक दगडासारखे गार होऊन पडले आहेत, रावसाहेबांचा भिरभिर फिरणारा देह त्या पिंपळाच्या झाडाला टेकून निश्चल उभा आहे; त्यांचे डोळे मिटलेले असले तरी चेहऱ्यावरचं तेज अणुमात्र कमी झालेलं नाहीं! आणि मी— माझं पार्थीव शरीर या दरवाजाच्या शेड्याला टेकून उभं आहे. अन् माझ्या निर्जीव हाताची निशाणाला बसलेली पकड जरादेखील ढिली झालेली नाहीं! आईसाहेब रडून आकांत करीत आहेत अन् बापूसाहेब खदखदां हंसत आहेत! या कल्पनेनें माझ्या आंगावर कांटा उभा राहिला!

मी झटकन् ती कल्पना मनावेगळी केली. मला हंबीरचं वाक्य आठवलं, 'रडून जगण्यापेक्षां लढून मरा.'

माझी नजर वर फडफडणाऱ्या निशाणाकडे गेली. हातोडा-कोयत्याचें ध्वजचिन्ह नवचैतन्यानें नाचत होतें! मी मनाशीं म्हटलं, 'मी अशी थिजून कधींही मरणार नाहीं! हा ध्वज आकाशांत नाचवित नाचवित मरेन!'

मला आश्चर्य वाटलं. अन् बापूसाहेबांच्या वृत्तिबद्दल मला कांहीं तर्कच करतां येईना. मुलाचा हात धरून एक आंधळा भिकारी भीक मागायला आला. त्याला शिळेंपाकें अन्न घालून मोलकरणीनें जायला सांगितलें. पण भिकाऱ्याची चिमट ही रेतीच्या जमिनीसारखी असते. कितीही पाणी घातलं तरी पुन्हां आपलं हवंच! मिळालेल्या भीकेवरून त्याला घराच्या मोठेपणाची कल्पना आली अन् अधिक मिळण्यासाठीं तो ओरडूं लागला!

तें बापूसाहेबांनीं ऐकलं. अन् त्यांनीं वरूनच मोलकरणीला सांगितलें, 'त्या आंधळ्याला शेर, अडिसरी धान्य घाल!'

अडिसरी धान्यानें त्या भिकाऱ्याची झोळीच भरली. अनेकदां हात जोडीत आणि बापूसाहेबांना धन्यवाद देत तो भिकारी निघून गेला.

ज्या घरांत भिकाऱ्यांना भरपूर भिक्षा मिळते, त्याच घराच्या दारांत कालपासून तीनशे लोक उपाशी बसले असतांना, त्यांना अन्नाचा कणही मिळूं नये हें आश्चर्यच नाहीं कां? ज्या लोकांनीं खंडोगणती धान्य पिकवून यांच्या घरांत भरलें, यांचे वाडेहुडे बांधून दिले अन् हरघडी यांचीं कष्टाचीं कामं उपसलीं ते लोक भिकाऱ्याहूनही नीच ठरले कीं काय?

बापूसाहेबांना भिकाऱ्यांची दया यावी अन् आपल्याच शेतकऱ्यांच्याबाबतींत मात्र त्यांनीं निर्दय व्हावं, याचा मला अर्थच कळेना!

मी मनाशीं पुनः पुन्हां एकच प्रश्न विचारीत होतें,

बापूसाहेबांना यांची दया कां येत नाहीं?

## बापूसाहेब

## : १६ :

यांची दया कां येत नाहीं ?

खरंच कां येत नाहीं ?

त्या आंधळ्या भिकाऱ्याची मला दया आली. एकदम मी त्याला अडिसरीभर धान्य घालायला सांगितलं ! बाकी भिकाऱ्यांच्याबाबतींत एक वचकच बसल्यासारखा झालाय मला. त्या एका भिकाऱ्याला मी मारून वाड्याबाहेर हाकलला होता. त्याचे ते शब्द अजून माझ्या कानांत घुमतात, 'तुझा सत्यानाश होईल. देव तुझं चांगलं करणार नाहीं !' अन् तेव्हांपासूनच आमच्या घरांत अनर्थाला सुरुवात झाली! त्या भिकाऱ्याचा शापच आम्हाला भोंवला! नाहींतर याच्यापूर्वी काय भगवानला कळत नव्हतं, का हे लोक उपाशी मरत नव्हते ? पण यंदासारखे हे कधींच भडकले नव्हते, हें जसं मला कळून चुकलं तसा मी निश्चयच केला, वाटेल तसला भिकारी

येवो, त्याला विन्मुख तर पाठवायचा नाहींच उलट तो संतुष्ट होऊनच या वाड्यांतून बाहेर पडला पाहिजे !

आणि या एका कारणामुळेंच नाहीं, तर साहजिकच मला त्यांचीं दया येते ! त्या बिचाऱ्यांना पिकवून खायला शेत नसतं कीं रहायला घर नसतं. जगाच्या पाठीवर कुठंहि भटकणारे अभागी जीव ते— त्यांना आम्हीं भीक घातली नाहीं तर त्यांनीं काय खायचं ? त्यांची ती दीनवाणी लाचार मुद्रा पाहिली, कीं त्यांना सढळ हातानं भिक्षा वाढायला मी घरांत सांगतों !

पण तेंच मी या दारांत धरणं धरून बसलेल्या लोकांकडे पाहिलं कीं त्यांची दया येण्याऐवजीं मला रागच येतो ! त्यांच्या दीन मुद्रा मला दिसतात. पण ते लाचार नाहींत, बदमाष आहेत !

हे लोक कष्ट करून चांगलीं शेतं पिकवितात. त्यापैकीं योग्य तो खंड मला देऊन बाकी सगळं आपण घेतात ! त्यांच्या श्रमाचा मोबदला त्यांना मिळत असतांना जवळचं संपलं म्हणून यांनीं माझ्याकडे पोटाला मागायला येणं हा काय न्याय झाला ? ते मला खंड देतात हा काय त्यांचा माझ्यावर उपकार होतो ?

पण यांना तो उपकार वाटतो. अन् त्या दृष्टीनेंच ते माझ्याकडे मागायला येतात. हें मला कधींतरी आवडेल का ? यांनीं असं मागण्यापेक्षां सरळ भीक मागावी ! मी यांना सढळ हातानें भीक वाढीन. पण यांना भीक नको, हक्क हवा !

अन् हा हक्कच मला जाचक होतोय !

भिकाऱ्यापेक्षांही यांची बिकट परिस्थिति असेल हें मी जाणतों. पण हे पोटाला मागायला येतात, ते हक्कानं ! देखत ऐकत भिकारी हे ! यांचा हा हक्क मी कां चालू द्यावा ?

बाकी ते तरी कशाला हक्क दाखवायला जातात म्हणा ! पण आमचे हे दिवटे चिरंजीव आहेत ना ! हातांत कोलीत घेऊन त्यानें नाचायचं अन् त्याच्याभोंवतीं या भुतांनीं फेर धरायचा !

पण या भुतांना गाडणारा मी मांत्रिक आहे म्हणावं !

भगवानसह लेकाचे दोन दिवस इथं उपाशी बसलेत, सत्याग्रह करतायत ! अशा उपाशी बसण्यानं अन् सत्त्याग्रहानं जर हवी ती गोष्ट मिळत असती तर सरकारनं केंव्हांच गांधींना स्वराज्य बहाल केलं असतं !

प्रत्यक्ष मारामारी करून लुटालूट करायला हे आले असते, तरी जिथं मी यांना भ्यालों नसतों तिथं यांच्या या उपाशीं बसण्याला मी थोडीच भीक घालणार आहे ! अन् दोन दिवस मी त्याप्रमाणेंच वागत आहे. यांची काडीभरदेखील फिकीर बाळगीत नाहीं मी ! उपाशीं बसता ना ? खुशाल बसा !

पण मला हसूं येतं आणि वाईटहि वाटतं तें फक्त एकाच गोष्टी-बद्दल. ती गोष्ट म्हणजे भगवानाचें वेड ! डोंगरासारखं श्रीमंती वैभव ज्याच्या घरीं आहे, त्यानं या भिकाऱ्यासाठीं उपाशीं राहाणं म्हणजे, वेडेपणाची कमालच नाहीं का ? पण मी आतां त्याच्या बाबतींत अधिक विचारच करीत नाहीं कधीं ! सुखाच्या समुद्रांत पडूनही तें एकाद्याला भोगतां आलं नाहीं तर त्याच्या दुर्दैवाला कुणी काय करायचं ? प्राक्तनाप्रमाणं या गोष्टी घडत असतात ! एका कविनं म्हटलंच आहे कीं, 'होणारें न चुकेल होइल, जरी ब्रह्मा तया आडवा !' मी कितीहि तळमळलों तरि त्याचा काय उपयोग आहे !

वाईट एवढंच आहे, कीं या भुतांना गाडतांना त्यांच्याबरोबर माझ्या मुलालाही...... पण त्याला माझा इलाज आहे का ? त्यांच्या

अगोदर तोच खड्ड्यांत पडूं लागला तर त्याला मी काय करणार ?

भगवानच्या आईला मात्र फारच वाईट वाटतंय. वाटाय-चंच ! किती केलं तरी आईचं आतडं तें ! दोन दिवसांत त्यांनीं अन्नाचा कणसुद्धां घेतला नाहीं. काल हें मला कळलं, तेव्हां मुद्दाम मी आंत जाऊन त्यांना म्हटलं, ' तुम्ही जेवलां नाहीं ! '

' मी माणूस आहें ! '

मला राग आला त्यांचा. मी रागानेंच विचारलं,

' अन् मी ? '

' तुम्ही देव आहांत ! '

' चुकून भलताच शब्द पडला हा ! '

' नाहीं. खरंच तुम्ही देव आहांत ! जगांतल्या दलितांचीं सुखदु:खं देवाला कळत नाहींत, दिसत नाहींत ! तुम्हांला तरी......'

' तुम्ही जेवण करा बघूं आतां ! '

' मी जेवण करूं ? आपल्या जिवाचा आधार नि आपल्या शेतांत राबणारे हे लोक दारांत उपाशी असतांना मी जेवण कसं करूं ? '

' जाई, ताट भरून आण. जेवण कसं करायचं तें मी इथं बसूनच तुम्हांला शिकवितों ! '

त्यांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. त्या रडतच म्हणाल्या,

' माझी एवढी काळजी तुम्हांला वाटते, अन् आपल्या एकुलत्या एका मुलाची कांहींच काळजी वाटत नाहीं ? असं करून कसं होणार ? सुरेंद्राची ती गत झाली ! आणि भगवानशींही तुम्ही असं वैऱ्यासारखं वागूं लागलांत तर आपण जगायचं तरी कशाच्या आधारावर ? कांहीं झालं तरी भगवान आपला मुलगा आहे.

लहानपणीं त्याचे तुम्हीं अनेक हट्ट पुरविले आहेत—एकदां बेळगांवला तुम्हीं त्याला कुस्त्या बघायला नेलांत. तिथं त्यानं कुणा पैलवानाची वाघाच्या कातड्याची चड्डी पाहिली. घरीं आल्यावर तसल्या चड्डीचा त्यानं हट्ट घेतला. मी कांहीं बोलायच्या अगोदर तुम्हीं बंदुक घेऊन शिकारीला गेलांत; आणि वाघाची शिकार करून त्याच्या कातड्याची भगवानला चड्डी करून दिलीत. त्यावेळीं त्याच्या हट्टापुढं तुम्हीं आपल्या जिवाचीदेखील पर्वा केली नाहीं! आणि आजच असं कां करतां ? हा एक त्याचा हट्टच समजून त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यातच आपलं हित नाहीं कां ? त्या लोकांकरितां नव्हे, आपल्या जिवाच्या आधारासाठीं–भगवानसाठीं एवढं करा!'

त्यांना काय बोलावं मला कळेना. त्यांच्या रडव्या बोलण्याचा माझ्या मनावर भलताच परिणाम झाला होता. कांहीं न बोलतां मी चटकन् बाहेर दिवाणखान्यांत आलों.

भगवान माझा मुलगा असला, तरी तो जोपर्यंत या लोकांसाठीं भांडत आहे तोपर्यंत–हरभऱ्याबरोबर किडा भरडला जाईल म्हणून मी मुळींच दुःख करणार नाहीं!

मी नमतं तर मुळींच घेणार नाहीं. पण हे लोक कांहीं कमिजास्त करूं लागले तर दहावीस नव्हे पांचपन्नास बेरड आणीन. एकेकाला फोडून काढीन! अन् त्याचवेळीं यांना सत्याग्रहाचा खरा फायदा कळेल!

यांना वाटत असेल, रावसाहेब आहेत आपल्याबरोबर. रावसाहेबांच्या पुढें बापूसाहेब काय करणार आहेत ?

पण रावसाहेबच काय, प्रत्यक्ष परमेश्वर आला तरीहि मी त्याला डरणार नाहीं!

## भगवान                                                    : १७ :

बापूंचं तें वाक्य माझ्या वर्मी लागलं—

'मुंग्राला तूं घालवलास—मारलास!'

क्रोधाची उर्मी मी आंतल्या आंत गिळली. त्याबद्दल पुन्हां एकहि शब्द त्यांना बोललों नाहीं! अन् काय बोलायचं? ज्यांना माणुसकी, दया, प्रेम, कर्तव्य हे शब्दच माहीत नाहींत, त्यांना बोलूनच नव्हे—त्यांच्यापुढं डोकेफोड करून तरी काय उपयोग?

मला मोठी आशा वाटली होती—

या लोकांचा निर्धार बघून बापूंना थोडीतरी दया येईल, ते यांना पोटाला देतील अन् सलोख्यानंच यांच्या पोटाचा प्रश्न तात्पुरता तरी सुटेल!

पण मुळांत माझंच चुकलं! मी यांना सत्याग्रह करायला लावला तो माणसापुढं नाहीं; राक्षसापुढं!

राक्षस नाहीं तर काय!

माझ्यासकट हे सगळे लोक दोन दिवस यांच्या दारांत उपाशी बसले आहेत तरी त्यांनीं एका शब्दानं देखील चवकशी केली नाहीं. त्यांना कसली घमेंड आहे तेंच मला कळेना! लोकमताचा समुद्र खवळल्यावर मोठमोठ्या राजसत्तेच्यासुद्धां ठिकऱ्या उडायला जिथं वेळ लागत नाहीं, तिथं बापूसारख्यांनीं एवढी घमेंड बाळगायची म्हणजे—एकाद्या बाजरीच्या ताटानें महापुराच्या लोंढ्यापुढें देखील आपण नमणार नाहीं, अशी ईर्षा करण्यासारखेंच नाहीं का?

बाकी या लोकांच्या सहनशीलतेचं मात्र मला कौतुक वाटतं! या अडाणी लोकांचा सत्याग्रह घडवून आणायचा आणि तोही असा उपाशी राहाण्याचा; केवढं अवघड काम! पण माझ्या सांगण्याप्रमाणें बिचारे दोन दिवस उपाशी राहिले. कुणी हूं कीं चूं केलं नाहीं. कशाला करतील म्हणा! ज्यांना नेहमींच अर्धपोटीं राहावं लागतं त्यांना हें दोन दिवस उपाशी राहाणं म्हणजे कांहींच वाटत नसेल! एक वेळचा चहा चुकला तर बापू जितके तळमळतील, तेवढेसुद्धां या दोन दिवसांच्या उपासानं हे तळमळत नाहींत!

पण कांहीं झालं तरी हीं माणसं आहेत! सहनशीलता त्यांनीं दाखवायची तरी कुठंवर? दाव्याला बांधलेलं जनावर देखील पोटाला मिळालं नाहीं, कीं दवासण्या तोडूं लागतं! मग यांच्या सहनशीलतेची मी मर्यादा पाहाणं कधींतरी योग्य ठरेल का? तें कांहीं नाहीं!

आजच्या आज यांच्या पोटाचा प्रश्न सुटलाच पाहिजे!

तो रडून सुटण्याचा मार्ग संपला. आतां एकच मार्ग उरला! लढून!

मी त्या तयारीला लागलों !

डॉक्टरांच्या सल्ल्यासाठीं आश्रमांत जाऊन त्यांना विचारलं,

‘ काय करायचं आतां ? ’

‘ तें सर्वस्वीं मी तुझ्यावर सोंपवलंय. तुला जें वाटेल तें तूं करावंस ! पण सगळं विचारपूर्वक ! अन् कांहींच करतां येत नसेल तर त्या तीनशें लोकांचे सरळ मुडदे होऊन पडूं देत तिथं. म्हणजे राक्षस म्हणून का होईना, पण बापूसाहेबांचं नांव इतिहासांत अजरामर होईल ! ’

‘ अन् माझं ? ’

‘ दुबळ्या माणसांच्या नांवाला कुठंच स्थान नसतं ! ’

डॉक्टरांचा असलाच सल्ला मिळणार याची मला कल्पना होतीच ! बापूंचा स्वभाव त्यांना पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें सुरुवातीसच त्यांनीं सांगितलं होतं, ‘ असल्या उपासतापासानं तुम्हाला कांहीं मिळणार नाहीं ! ’ आतां त्यांनीं तेंच सांगितलें. अन् त्यांच्या त्या उपरोधी भाषेनें तर मला अधिकच त्वेष चढला. मी रागानेंच उठून जायला निघालों. तेव्हां टपालांतून आलेलं एक पत्र त्यांनीं मला दिलं. तें पद्माचं होतं अन् बरंचसं जाड होतं ! तें फोडून वाचायला पांच मिनिटांचीदेखील मला सवड नव्हती. मी तें खिशांत टाकलं. अन् वाड्यावर आलों !

सगळ्या लोकांना उभें रहायला सांगितलें. चटकन् उठण्याचेंसुद्धां त्यांच्यांत त्राण नव्हतें. त्यांचे चेहरे मलूल झाले होते. हातपाय लट्लट् कापत होते. पण मी उभें राहायला सांगतांच त्यांच्या चेहऱ्यावर आतां या उपासांतून सुटका होणार, अशा अर्थाचें समाधान दिसूं लागलें.

मी त्यांना सांगितलें, ‘ हा उपासाचा मार्ग सोडून आज आपणांला दुसऱ्या मार्गानें जायचें आहे ! ’ ‘ ठीक. तयार आहों ! ’ अशा अर्थाच्या सगळ्यांनीं माना हलविल्या.

लगेच मी खालूनच ओरडून बापूंना हांक मारली.

ते गॅलरींत आले. त्यांना पाहून मी म्हटलें,

‘ दोन दिवस तुमच्या दारांत उपाशी बसलेल्या या लोकांकडे पहा जरा ! यांची ही कळा बघून राक्षसाला दया येईल, फत्तराला पाझर फुटेल ! ’

‘ मी फत्तराहून कठीण आहे ! ’

‘ हातोड्याच्या घावानं फत्तराच्या ठिकऱ्या उडतात ! ’

‘ पण त्या ठिकऱ्या इतक्या तीक्ष्ण असतात, कीं हातोडा मारणाराचें कपाळ फोडल्यावांचून कधीं राहायच्या नाहींत ! हरामखोरा ! स्वतःच्या बापाला असं बोलतांना तुला थोडीसुद्धां लाज वाटत नाहीं ? असे गुण उधळशील याची मला कल्पना असती, तर तुझ्या जन्माच्या वेळीं मी पेढे वांटले त्याऐवजीं तुझ्या तोंडांत विषाचे गोळे भरले असते ! ’

‘ चूक केलीत तुम्ही त्यावेळीं ! तिचा पश्चाताप करण्यापेक्षां आतां आलेल्या प्रसंगाला तयार व्हा ! ’

मी सगळ्या लोकांना रामराम करायला सांगितलें. त्यांनीं दोन्ही हात वर करून बापूंना रामराम केला. जणुं पुढील लढ्याची ती सलामीच होती ! बापू दांतओठ खात असलेले मला दिसले. पण त्यांनीं आपला हात जरासुद्धां वर उचलला नाहीं.

धान्याचीं पेवं गुरांच्या वाड्यांत होतीं. तीं उकरायला जाणं हें पुढचं काम होतं. तें काम करायचं म्हणजे समरांगणांत उडी

घेण्यासारखंच होतं. हे लोक पेव उकरूं लागल्यावर बापू स्वस्थ बसणं कधींच शक्य नाहीं. कदाचित् त्यांनीं पूर्वींच मारेकरी आणून गांवांत ठेवले असतील. या गोष्टीला ते कधीं विसरायचे नाहींत! अर्थात् तिथं जायचं तर पूर्ण तयारीनंच जायला हवं होतं !

सगळ्या लोकांसह आधीं मी आश्रमांत गेलों. त्यांना पेवं उकारयला खोरीं, कुदळीं अन् धान्याला पोतीं घ्यायला सांगितलें. आश्रमांत होत्या त्या लाठ्या कांहींजणांना दिल्या. आणि माझ्या तालमींतल्या सगळ्या तरुणांना भाले बरच्यासह तयार केलें. मीही माझें पिस्तुल भरून घेतलें. ही सगळी तयारी बघून रावजी· बाबा तर घाबरूनच गेला ! तो मला परोपरीनें विनवूं लागला. पण पुढं डोंगर आला असता तरी त्यावेळीं मला अडवणं त्याला अशक्य होतं !

जयनादाच्या ललकारींत हा मोर्चा घेऊन मी गुराच्या वाड्यावर गेलों. तिथं कुणीच नव्हतं. पण दरवाजा बंद होता. पुढं होऊन मी कुदळीच्या तुंब्यानेंच कुलूप मोडलें. दरवाजा उघडला गेला !

मधल्या चौकांत पेवांच्या खुणेचे आठदहा दगड स्पष्ट दिसत होते. त्यांपैकीं चार पेवं मी उकरायला लावलीं. लाठीवाले आणि भालेबरचे घेतलेले तरुण बाहेर उभे केले. सुभद्राहि निशाण धरून बाहेरच उभी राहिली.

चारी पेवांवरची माती उकरली. त्यावरच्या शिळा काढून बाजूला टाकल्या. चार गडी चारी पेवांत शिरले. अन् धान्य उपसायला सुरवात झाली !

दुर्धर प्रसंग ओढवला अन् बापू आंत आले, तर वरून शिळा टाकून या चार गड्यांचे बळी घ्यायला ते कांहीं कमी करायचे

नाहींत! म्हणून त्या गड्यांना चट्कन् वर घेतां येण्याचीही मी योजना करून ठवली!

चार पांच पोतीं भरलीं असतील नसतील! तोंच बाहेर एकदम झालेला गोंगाट, काठ्यांचे आवाज नि सुभद्रेची किंकाळी माझ्या कानावर आदळली! पेवांतल्या त्या चार गड्यांना मी अगोदर वर घेतलें. अन् तीराच्या वेगानं बाहेर धावलों.

पन्नास एक बेरड बाहेरच्या लोकांवर तुटून पडले होते.

सुभद्रेच्या हातांतलें निशाण घेण्यासाठीं बापू तिच्या हातावर नि आंगावर काठीचे तडाखे देत होते! तें मला बघवलं नाहीं!

पण मी तिकडें जायच्या अगोदरच त्यांनीं मला पाहिलं. अन् 'धरा. या सैतानाचा अगोदर इथं मुडदा पडूंद्या!' म्हणून चार बेरडांसह ते वाऱ्यासारखे माझ्या आंगावर धांवले. आणि आपल्या हातांतली शिसवीची काठी त्यांनीं माझ्या डोक्यावर मारली. माझ्या हातांत भरलेलं पिस्तुल होतं.

पण तें बापूंवर उडवायचं?

माझा हातच वर झाला नाहीं! त्यांच्या काठीच्या अन् त्या बेरडांच्या मारानें माझं मस्तक बधिर झालं! मी तिथंच जमिनीवर कोलमडलों. मनाची जाणीव अजिबात नष्ट झाली!

पुढं काय झालं, मला कळलं नाहीं!

---

## सुभद्रा : १८ :

बापूसाहेबांनीं अगदीं जोरानें माझ्या हातावर प्रहार केले. माझ्या हातांतल्या सगळ्या बांगड्या फुटल्या. मनगटावर तर ठिकठिकाणीं रक्त साकळलं !

पण मी निशाणाचा हात अजिबात सोडला नाहीं !

रावसाहेब बाहेर आल्याबरोबर बापूसाहेब त्यांच्याकडे वळले. रावसाहेबांच्या हातांत पिस्तुल असल्यामुळें, ते त्यांना कांहीं करणार नाहींत अशी माझी कल्पना होती. पण त्यांनीं पिस्तुलाचा उपयोग केला नाहीं. अन् या राक्षसांनीं मात्र—

रागाच्या भरांत जनावराला मारतांनादेखील माणसाला विवेक राहतो. पण यांनीं आपल्या पोटच्या मुलाच्या उघड्या डोक्यावर काठ्यांचे नि सळयांचे फटाफट आवाज काढले !

रावसाहेबांच्या हातांतलं पिस्तुल गळून खालीं पडलं. आणि नेहमीं कपाळावर रुळणारे केस मागें सारण्यासाठीं जसा त्यांचा

उजवा हात वर जातो— अगदीं तसा हात वर गेला. अन् ते मागें जमिनीवर पडले !'

मला भान राहिलं नाहीं !

जिवाहून प्यार वाटणारं तें निशाण मी दुसऱ्या माणसाच्या अंगावर फेकून दिलं. अन् तिकडे धावलें. रावसाहेब पुरे बेशुद्ध झाले होते. त्यांचं मस्तक अलगद उचलून मी त्याखालीं माझी मांडी दिली. माझं पातळ रक्तानं भरून गेलं. तरीहि बापूसाहेब मारणार होते, कीं काय कुणास ठाऊक ! त्यांनीं काठी उगारली तशी मी रावसाहेबांच्या चेहऱ्यावर ओणवी झालें. अन् म्हटलें, ' मारा, काय मारायचं असेल तेवढं !

पण त्यांनीं वर उगारलेला हात खालीं येऊंच शकला नाहीं !

एका तरुणानें नेम धरून त्यांच्यावर भाला फेकला. क्षणार्धांत तो त्यांच्या पोटांत घुसला. अन् रक्ताच्या चिळकांडीबरोबर त्यांचीं आंतडीं बाहेर आलीं ! धाडकन् ते जमिनीवर पडले !

तसे पडतांना त्यांच्या तोंडून जो शब्द निघाला त्यानें क्षणभर माझें हृदय हलवून सोडलें ! माझा माझ्या कानावर विश्वासच बसेना !

त्यांनीं आपल्या हृदयांत दडपून टाकलेल्या सुप्त, गुप्त अशा पितृप्रेमाचा जणुं कारंजाच उसळून वर आला होता ! प्रेम, वात्सल्य नि आर्तता यांचा निदर्शक असा एकच शब्द त्यांच्या तोंडून निघाला,

' भगवान ! '

त्या अकल्पित शब्दाचा अभिनव ध्वनि रावसाहेबांच्या कानांत घुसल्याबरोबर त्यांनीं डोळे उघडले. पण समोरचं दृश्य त्यांच्या

डोळ्यांना असह्य झाल्यानें ' बापू... ' हा एकच करुणरव काढून त्यांनीं पुन्हां डोळे झाकले. समरांगणांत पडलेल्या त्या पितापुत्रांच्या प्रेमोर्मी उसळल्या होत्या, पण त्या असल्या बिकट क्षणीं, कीं त्यांना एकमेकांना तोंडभर बोलण्याची शक्यता असूं नये अन् एकमेकांजवळ येण्याची ताकदच नसावी!

त्या दुर्दैवी घटनेनं मला भडभडून आलं!

बापूसाहेब पडल्याबरोबर सगळे बेरड पळून गेले.

बापूसाहेब आणि रावसाहेब यांना आश्रमांत नेऊन डॉक्टरनीं उपचार सुरू केले!

  

तिसऱ्या दिवशीं रावसाहेबांना थोडं बरं वाटूं लागलं. पण बापूसाहेबांची स्थिति अगदींच विकोपाला गेली. आजचा दिवस तरी टळतोय कीं नाहीं, याची शंका होती. गेल्या दोन दिवसांत त्यांनीं एकच ध्यास घेतला होता, सुरेंद्र अन् तारा! घडीघडीला ते त्यांच्याबद्दलच विचारीत होते. पण डॉक्टरनीं पहिल्याच दिवशीं वर्तमानपत्रांत तारा करून जाहिराती पाठविल्या होत्या. तरी त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

चारच्या सुमारास त्यांनीं रावसाहेबांना नि आईसाहेबांना जवळ बोलावलें. आईसाहेबांच्या मांडीवर डोकें टेकायची त्यांची इच्छा होती. पण त्यांना डोकें उचलण्याची ताकद नव्हती. मी तें हळूंच उचलून आईच्या मांडीवर टेकविलें. तसं करतांना मी त्यांच्या तरळत्या दृष्टीकडे पाहिलें. त्यांच्या दृष्टींत कोमलपणाशिवाय आणि प्रेमाच्या ओलाव्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें!

रावसाहेबांना त्यांनीं अगदीं जवळ घेतलें.

तीन दिवसांपूर्वी एकमेकांच्या जिवावर उठणारे हे दोन जीव आज मृत्यूच्या दारांत जवळ जवळ येत होते.

त्यांना बोलतांना त्रास होत होता. अन् बोलायचं तर पुष्कळ होतं. ते हलक्या आवाजांत म्हणाले, ' आतां तुमच्या मनाप्रमाणें सगळी व्यवस्था करा ! '

' आतां ! बापू, किती उशीरां पटलं हें तुम्हाला ! '

सगळयांच्या डोळयांतून पाणी वाहूं लागलें.

' नाहीं. पटलं नाहीं ! अन् या जन्मीं तें पटणं शक्य नाहीं. म्हणूनच मी दुसरा जन्म घ्यायला जातों. त्या जन्मांत मात्र गरिबांचं हित हेंच ध्येय मी डोळयापुढें ठेवीन ! '

' बापू... ' रावसाहेबांना हुंदका आवरला नाहीं.

' भगवान, रडूं नकोस.' या उपाशी मरणाऱ्या शेतकऱ्यांसाठीं तुला जें करतां येईल तें कर. धान्याचीं दहा पेवं भरलीं आहेत, तीं यांना खुली करून दे ! ' सगळं तुझ्या ताब्यांत देत आहें. पण असं करतांना एक गोष्ट विसरूं नकोस ! '

' कोणती ? '

' सुरेंद्र अन् तारा ! त्या अभागी स्त्रीला अन् त्या दुर्दैवी पोराला जगांत कुठं कुठं आसरा मिळायचा नाहीं. वाटेल तें करून त्यांचा शोध लाव ! लावशील ना ? '

' त्यांची कांहीं काळजी करूं नका ! '

' मला वचन दे. ताराला नि सुरेंद्राला...! '

पण रावसाहेबांचें वचन घ्यायच्या अगोदरच त्यांचा आत्मा अनंतांत विलीन झाला.

सगळ्यांच्याच दुःखाला पारावार राहिला नाहीं! अन् राव-साहेबांच्या तोंडून तर 'बापू, बापू, बापू!' याशिवाय दुसरा शब्दच निघेना!

आईसाहेबांचं सांत्वन करणं तर ब्रह्मदेवालाही अशक्य व्हावं इतकं त्यांचं दुःख अनावर होतं. पतिपुत्रांच्या भांडणांत पतिचा बळी पडलेला डोळ्यानं पाहून त्या माऊलीचं हृदय कसं विदीर्ण होत असेल त्याची कल्पनासुद्धां करतां येणार नाहीं!

गांवचा जमीनदार मेल्यामुळें नुसत्या आश्रमांतच नव्हे तर सगळ्या गांवांतच एकप्रकारची उदासीनता जाणवूं लागली. आप-णाला छळणारा गेला म्हणून शेतकऱ्यांना पाशवी समाधान मुळींच वाटलं नाहीं. उलट दुःखच झालं! दोन दिवस उपाशीं राहावं लागलं म्हणून त्यांनीं पेवं उकरण्याचा अत्याचार केला. पण बापू-साहेबांच्या मृत्यूनंतर त्या पेवांतलें धान्य आणून खायची त्यांना इच्छाच होईना!

शेवटीं त्यांची उपासमार बघून आईसाहेबांनीं सांगितलं, अन् डॉक्टरनीं पुढं होऊन त्यांना धान्य दिलं!

बाबांनीं तर दोन दिवस अन्नाला स्पर्श केला नाहीं. ते म्हणत होते, 'आपल्या राजाला आपल्या हातानं मरण यावं, यासारखं दुसरं दुर्दैव नाहीं! कसाहि असला तरी तो आमचा राजा होता!'

  

मी हळूच रावसाहेबांच्या खोलींत डोकावलें. त्यांचा डोळा लागला होता. पण ते तोंडानें म्हणत होते, 'पद्मा, थांब. जाऊं नकोस!'

त्यांना स्वप्न पडलं असावं म्हणून मी जागें केलें. अन् उगीचच खिडकींतून बाहेर पहात हांक मारली, ' पद्मा— '

' कुठली पद्मा ? '

' तुमच्या डोक्यांतली ! '

' मग बोलली कां ? '

' मुकी दिसतेय ! '

' मुकी कां, चांगली बडबडी आहे ! त्या खिशांत तिचं पत्र ठेवलंय मी. अजून वाचलं नाहीं. तेवढं वाचून दाखीव ! '

या आठवड्यांत त्यांचं दुःख बरंच कमी झालं होतं. अन् ते मोकळ्या मनानें बोलत होते. मी त्यांच्या खिशांतलें पत्र घेतलें. तें फोडलें देखील नव्हतें. ते फोडलें अन् त्यांच्या जवळ बसून वाचूं लागलें,

' प्रिय भगवान,

ज्या दुर्दैवानं माझ्या हृदयावर जबर आघात केला तें अधिक उघड करून तुमच्या सहानभूतीलाही पारखें होऊं नये म्हणून, मी त्याचा मागील पत्रांत ओझरता उल्लेख केला, अन् मला विसरून जाण्याबद्दल विनविलें. पण तुम्ही त्याला न जुमानतां मला निकडीनें यायला लिहिलेंत. म्हणून आतां सत्यपरिस्थिति सांगणें भाग पडत आहे.

आईला बरं वाटतांच मी तुमची माहिती तिला सांगितली, अन् तुमच्यावरचं माझं प्रेमहि निवेदन केलं ! पण तें ऐकून आईनं तोंड वाईट केलं. अंगावर कडा कोसळल्याप्रमाणें ती हद-रली. अन् म्हणाली,

‘ पद्मा काय केलंस हें ? ’

जगाविरुद्ध मी काय केलं होतं ? उलट एका जमिनदाराच्या मुलावर माझं प्रेम बसलं म्हणून तिला अभिमानच वाटायला हवा होता. मला तिचा राग आला ! पण तुम्हाला माहीत आहे, आईशिवाय मला कुणी नाहीं ! तिला दुखवणं माझ्या जिवावर येतं. म्हणून मी तिला म्हटलं, ‘ आई, माझं कांहीं चुकलं का ? चुकलं असलं तर तें मी दुरुस्त करीन ! ’

‘ फार फार चुकलीस. पद्मा, विवाहपूर्व पुरुषाची संगत ही नवख्या माणसाची तारेवरली कसरत आहे ! इटकून त्याचा तोल जातो, अन् तोल गेला, कीं मग काय कपाळमोक्ष ठरलेलाच ! ’

‘ अन् मी लग्न केलं तर ? ’

‘ सोन्याहून पिवळं होईल. पण तें शक्य नाहीं. लग्नांत दोन गोष्टींची जरूरी असते; कुलीनता अन् बड्या पाहुण्याशीं पदर ! ’

‘ मी कुलीन नाहीं काय ? ’

‘ तूं कुलीन आहेस ग. पण तुझा कुलीनपणा जगाला पटायचा नाहीं. अन् मी पटवायला गेलें तर जगाला तो खरा वाटायचा नाहीं ! ’

ती काय बोलत होती, मला कळेना. आंतल्या कपाटांतून कांहीं लिहिलेले कागद आणून तिनें माझ्या हातांत दिले अन् म्हटलें, ‘ हें वाच. म्हणजे तुझा कुलीनपणा जगाला कां पटायचा नाहीं तें कळेल ! ’

ते कागद मी सोबत पाठविले आहेत. ते वाचा. म्हणजे माझ्या-

सारख्या पतित मुलीवर प्रेम केल्याबद्दल तुम्हाला पश्चाताप होईल ! आणि...पण त्यांत माझा कांहीं दोष नाहीं हो !

आपली दुर्दैवी
पद्मा. '

त्या कागदावर काय मजकूर वाचावा लागणार, या कल्पनेनें माझे हात थरथरूं लागले. विसावा घेण्याच्या निमित्तानें मी थांबलें. पण रावसाहेबांची अधीरता मला थांबूं देईना. मला वाचावं लागलं,

' पद्मा, '

कॉलेजांत असतांनाच माझं एका पुरुषावर प्रेम बसलं. लग्नाच्या शपथा घेतल्यामुळें आम्ही अगदीं स्वैरपणानें वागलों. पण दुर्दैव कधीं माणसाला सांगून येतें का ?

डॉक्टरीच्या अभ्यासासाठीं ते लंडनला जाणार होते. त्यांची जायची तारीख जवळ येत चालली तसतसा पुढच्या वियोगाच्या कल्पनेनें आमच्या हातून अधिकाधिक स्वैराचार घडला. ते जायच्या आदल्या दिवशीं रजिष्टर पद्धतीनें विवाह करून मोकळें व्हायचें असें आम्ही ठरविलें होतें. अन् दैवाचा दुसराच बेत चालला होता !

बाबांनीं माझ्यासाठीं एका बड्या जमिनदाराचें स्थळ पाहिलें होतें. अन् त्याच्या वाटाघाटींत ते होते. मी माझं प्रेम सांगतांच बाबांनीं आकाशपाताळ एक केलं. मला नाहीं नाहीं त्या शिव्या हासडल्या आणि चार दिवस घराच्याबाहेर पडूं दिलं नाहीं! याच अवधींत मी ज्याच्यावर प्रेम केलं तो माझ्या चवकशीसाठीं आला. त्यावेळीं बाबांचं नि त्याचं काय बोलणं झालं तें मला अजुनी कळलं नाहीं. त्याच्या तिसऱ्याच दिवशीं तो विलायतला जाणार होता.

पुढें त्या जमिनदाराशीं ठरणारं लग्नही हुंड्याच्या आकड्यांत मोडलं. एकपरी तें बरंच झालं असं मला वाटलं!

पण तें बरं झालं नाहीं. भयंकर वाईट झालं! माझा स्वैराचार भोंवला. मला गर्भ राहिला होता. त्या गर्भाच्या वाढीप्रमाणें गांवांतल्या कंड्याहि दररोज वाढत होत्या. लग्न कुठंच जमेना. अन् ज्याच्यापासून मला गर्भ राहिला तो तर परदेशीं गेलेला!

बाबांना हें कळलं तेव्हां त्यांनीं काय केलं असेल त्याची तुला कल्पनासुद्धां करतां यायची नाहीं.

ते सरळ माझ्या गर्भपाताच्या तयारीला लागले! त्यांच्या म्हणण्याला मी संमति दिली असती तर लगेच माझं लग्न कुठंतरी जमलं असतं. मी संसार करूं लागलें असतें. पण माझ्या पवित्र प्रेमाचा अंकुर मला खुडायचा नव्हता; वाढवायचा होता. तिथं राहून तें शक्य नव्हतं. म्हणून मी एका रात्रीं बाबांचं घर सोडलं. मुंबईला आलें. आणि तुझा जन्म झाल्यावर इथं नाशिकला येऊन हायस्कुलांत नोकरी धरली. अन् कपाळीचं कुंकू पुसून जगाला विधवा म्हणून सांगत सुटलें.

इतकं झाल्यावरही मला तुझ्या पित्याची चवकशी करतां आली असती. पण मला वाटलं, त्यांत माझीच छी थू होईल. जगापुढं मी विधवा म्हणून वावरत होतें. शिवाय दोन वर्षांत ज्यानं माझी चवकशी केली नाहीं तो तरी मला ओळख देईल काय? या शंकांनीं मी स्वस्थ बसलें. आज कुठल्यातरी शहरांत बडा डॉक्टर म्हणून तो सुखविलासांत दंग असेल. त्याला माझी आठवण देखील होत नसेल! माझ्यापाशीं मात्र त्याच्या तीन आठवणी आहेत. एक

तूं; जिची मी रोज पूजा करतें ती अंगठी अन् एक फोटो. तो फोटो मी तुला कधीं दाखविला नाहीं, कीं बाहेरहि काढला नाहीं. कसा काढणार? जी व्यक्ति मेली, असं म्हणून मी जगाला दाखविणार ती कुठंतरी जिवंत असणार!

पद्मा, तुझ्या जन्माची हकिकत ही अशी आहे. म्हणून मी तुझ्याबद्दल खूप खबरदारी घेतली होती. पण अखेर तूं एका पुरुषावर प्रेम करूं लागलीसच! हरकत नाहीं. पण माझ्या या अनुभवानं शहाणी हो. अन् प्रेम करण्यापेक्षां अगोदर लग्न कर! यापेक्षां तुला जास्त काय सांगूं!

तुझी
आई'

असल्या पतित मुलीवर रावसाहेबांचं प्रेम बसावं याचं मला नवल वाटलं. रावसाहेबांनीं तिचा संबंध तोडावा हेंच श्रेयस्कर! म्हणून मी म्हटलं,

'काय दुर्दैवी घटना बघा!'

'दुर्दैवी कसली? तिच्या आईची तर संमति आहे लग्नाला.'

'म्हणून काय झालं! असल्या मुलीशीं...'

'तिला पहा, अन् मग काय तें बोल!'

  

दुसऱ्या दिवशीं दुपारीं एक टांगा आश्रमासमोर थांबला. त्यांतून दोन स्त्रिया उतरल्या अन् त्या फाटकांतून आंत आल्या. मी लगबगीनें पुढें गेलें. त्यापैकी एक बरीचशी पोक्त होती. दुसरी?

स्वर्गीय अप्सराच होती ती! क्षणभर तिच्याकडे पाहातच मी उभी राहिलें. तिच्या गौरवर्णाला बदामी रंगाचं लाल काठाचं जॉर्जेट खुलून दिसत होतं. बिन बाह्यांचं भडक तपकिरी सॅटिनचं जाकीट तिच्या आंगांत तग बसलं होतं. तिनं आपल्या कानांत सोन्याचे तासाचे इअरिंग्ज घातले होते. अन् बोटांतली ती तांबड्या खड्याची अंगठी, मनगटावरचं तें सुंदर रिस्टवॉच तिच्या प्रत्येक वस्तूंत केवढी तरी मोहकता होती! ती कोण असावी हें मी साधारणपणें ओळखलं. अन् त्याचा खरेपणा पाहाण्यासाठीं मी तिच्याजवळ जाऊन म्हटलं,

'तुम्हांला मी ओळखलं. तुमचं नांव सांगूं?'

'हं.'

'पद्मा!'

माझा अंदाज खरा ठरला. त्या दोघीही हसूं लागल्या. त्यांना घेऊन मी रावसाहेबांच्या खोलीकडे गेलें. तिचं दार बंद होतं. मी दार उघडायला सांगितलं तेव्हां ते आंतूनच म्हणाले,

'कशाला'

'पद्मा भेटायला आलीय तुम्हाला?'

'तुला थट्टा करायची लहर आली असेल!'

'अहो नाहीं. खरंच!'

'बरं खरं! पण पद्मा कोण? मी पद्माला विसरून गेलोंय!'

त्यावर पद्मा म्हणाली, 'पण पद्मा तुम्हाला विसरूं शकत नाहीं!'

तो परिचित आवाज ऐकल्याबरोबर खटकन् बोलट फिरवून त्यांनीं दार उघडलें. अन् समोर पद्मा नि तिची आई बघून ते आश्चर्यानें थक्क झाले.

आंत बसल्यावर त्या दोघींनीं रावसाहेबांच्या प्रकृतिची प्रथम चवकशी केली. त्यांनीं 'बरं आहे.' म्हणून सांगितलं. ती पोक्त बाई पद्माची आई आहे असें कळल्यावर तिच्या रहस्यमय जीवनाची अगोदरच माहिती झाल्यामुळें, रावसाहेब तिच्याकडे पुनःपुन्हां निरखून पाहात होते.

पद्माची आई म्हणाली, 'तुम्ही जखमी झाल्याची हकिकत वर्तमानपत्रात वाचल्यापासून हिला अगदीं वेड लागल्यासारखं झालं. हिनं इकडे येण्याचा एकच ध्यास घेतला. अखेर मग हिच्याबरोबर येणं मला भाग पडलं!'

रावसाहेब म्हणाले, 'फार उत्तम झालं. सहजासहजीं माझा हेलपाटा वाचला!'

चहा वगैरे घेतल्यावर पुन्हां त्यांच्या गप्पा सुरू झाल्या.

डॉक्टर जवळच्या एका खेड्यांत गेले होते, ते चारच्या सुमारास परत आले. त्यांनीं पद्माला अजिबात पाहिलं नव्हतं. पद्मा आल्याचं कळल्याबरोबर ते रावसाहेबांच्या खोलींत आले.

त्यांनीं खोलींत पाऊल टाकलं नाहीं तोंच पद्माच्या आईची नजर त्यांच्याकडे गेली अन् 'तुम्ही...!' एवढा एकच शब्द तिच्या मुखांतून निघाला अन् ती बेशुद्ध पडली. डॉक्टरांनीं तिला पाहिल्याबरोबर त्यांच्याही तोंडून तसाच आश्चर्योद्गार निघाला,

'कोण उर्मिला?'

डॉक्टरांना पाहिल्याबरोबर 'तुम्ही' असा उद्गार काढून पद्माच्या आईनें बेशुद्ध पडणें आणि डॉक्टरनींही एकदम तिच्या नांवाचा उच्चार करणें याचा अर्थ काय? यांची पूर्वीची ओळख

असेल, कीं ज्या पुरुषावर पद्माच्या आईनें प्रेम केलें होतें, ते डॉक्टरच असतील ?

पद्माच्या आईनें डोळे उघडले. तारवटलेल्या नजरेनें डॉक्टर-कडे निरखून पाहिलें. अन् म्हटलें, ' मी एकाद्या भयंकर स्वप्नांत तर नाहीं ना ? '

' उर्मिला, हें स्वप्न नाहीं. सत्य आहे ! '

एकाद्या वेड्याप्रमाणें तिनें डॉक्टरांचे दोन्ही हात घट्ट धरून विचारलें,

' तुम्ही डॉक्टर आहांत ? '

' होय. मी डॉक्टर आहे ! अन् तुझा आहे ! '

उर्मिलेला हर्षवायु झाला. ती बडबडूं लागली,

' पद्मा, पद्मा ! हे माझे डॉक्टर ! हे तुझे वडील ! ! '

ज्यांनीं एकमेकांवर अत्युत्कट प्रेम केलं होतं, पण दुर्दैवानें ज्यांची दहावीस वर्षें ताटातूट केली होती, त्यांची ती प्रथम भेट पाहून मला गहिंवरून आलें. आणि ज्या मुलीला मी पतित समजून तिचा रावसाहेबांशीं विवाह होऊं नये असें मनांत इच्छित होतें, ती मुलगी डॉक्टरांची ठरली म्हणून मला आनंद झाला !

उर्मिलेच्या हकिकतीचे कागद रावसाहेबांनीं डॉक्टरना वाचायला दिले, आणि त्यांनीं ते वाचल्यावर म्हटलं, ' आतां तुमची हकीकत सांगा ! '

डॉक्टरनीं उर्मिलेची अजिबात चवकशी न करण्याचा कठोरपणा कां केला आणि एवढा कठोरपणा करूनही ते ब्रह्मचारी कां राहिले याचा आतां उलगडा होईल म्हणून सर्वचजण ऐकायला आतुर झाले.

डॉक्टर मोकळ्या मनानें सांगू लागले,

‘ माझ्या उर्मिलेला मी कधींही विसरलों नसतों. पण तरुणपणीं माणसाच्या मनावर त्यागाची धुंदी चढलेली असते ! अशा प्रकारच्या धुंदीनेंच माझा घात केला !

विलायतला जायच्या अगोदर दोन दिवस मी उर्मिलेच्या वडिलांकडे लग्नाबद्दल विचारायला गेलों. त्यांनीं हिची मला भेट न घेऊं देतांच विचारलं, ‘ तुमचं तिच्यावर प्रेम आहे ना ? ’

‘ अगदीं निस्सीम ! ’

‘ ती सुखी व्हावं असं तुम्हाला वाटतं ना ? ’

‘ केव्हांही ! ’

‘ ती सुखी होण्यासाठीं काय करूं शकाल ? ’

‘ वाटेल तो त्याग करीन ! ’

‘ मग तिच्याशीं लग्न न करण्याचं वचन द्या ! ’

तो म्हातारा अशा तऱ्हेच्या पेचांत मला पकडील याची कल्पनाच नव्हती. आणि मी तिच्याशीं लग्न न केल्यानं ती कशी सुखी होईल तेंहि मला कळेना. त्यानें सांगितलें, ‘ चाळीस हजार रुपये हुंड्यावर मी तिचं लग्न बोरगांवच्या जमिनदाराशीं ठरविलं आहे ! त्या बड्या जमिनदाराची पत्नी होण्यानंच ती खरी सुखी होणार आहे. तुमचं तिच्यावर प्रेम असल्यामुळें ती सुखी व्हावी म्हणून तुम्ही एवढा त्याग केला पाहिजे ! ’

त्याग, त्याग ! आपल्या आवडत्या माणसासाठीं त्याग करण्यांत अनुपम सौख्य असतं ! उर्मिलेच्या सुखासाठीं मी तिच्याशीं लग्न न करण्याचं वचन दिलं आणि त्या घराची पुन्हां पायरी चढायची नाहीं, असं ठरवून बाहेर पडलों.

त्याच्या तिसऱ्याच दिवशीं मी विलायतला जाण्यासाठीं बोटीवर पाय ठेवला. पण उर्मिलेची मूर्ति माझ्या डोळ्यापुढून हलत नव्हती. आणि मी केलं तें चूक की बरोबर हें माझं मलाच कळत नव्हतं!

तिथला अभ्यासक्रम संपवून मी परत आलों तेव्हां अनेक मुली मला सांगून आल्या. पण उर्मिलेच्या प्रेमाचा मला विसर पडला नव्हता. ज्या प्रेमानं कांहीं काळ मला स्वर्गीय सुख दिलं होतं; तें प्रेम नाहीं तर जगांत कांहींच नाहीं, म्हणून मी त्यापैकीं एकाहि मुलीशीं लग्न करूं शकलों नाहीं! अर्थात् तें एका मोठ्या आशेवर. ज्या प्रेमावर मी कांहीं काळ हक्क गाजविला होता, त्याचा उपभोग नसला तरी त्याच्या दर्शनावर सगळं जीवित घालवावं या आशेनं, आजन्म ब्रह्मचारी राहून समाजसेवा करण्याची प्रतिज्ञा करून मी इथं आलों.

पण माझी ती उरली सुरली आशाहि सफळ झाली नाहीं!

उर्मिला इथं नव्हती!

मनाला वाटलं, तिचं दुसरीकडे कुठं तरी लग्न जमलं असेल अन् ती सुखांत असेल! तिच्या दर्शनासाठीं मी आसुसलों असतांना दैवानं जो माझ्याशीं हा लपंडाव चालविला होता तोच बरोबर होता. कारण, तिचं मी दर्शन घेणं म्हणजे तिच्या सुखांत नि आपल्या दुःखांत नसतीं वादळं उत्पन्न करण्यासारखंच नव्हतं का?

इथं मला बापूसाहेबांनीं आधार दिला, यशोदाबाईनीं माया दाखविली आणि या गरीब शेतकऱ्यांनीं सेवा करण्याची संधि दिली! या तीन गोष्टीमुळेंच माझा जीव इथं रमला! अन् मी इतकीं वर्षें तपश्चर्या करूं शकलों. त्या तपश्चर्येचेंच आज हें फळ मिळालें!'

इतकें सांगून ते थांबले. झालेल्या त्या रहस्यमय प्रकारांत कुणा-चाच दोष नव्हता ! सगळयांच्याच चेहऱ्यावर हास्य खेळूं लागलें. उर्मिलाबाईच्या चेहऱ्यावर तर आनंदाचे रोमांच उभे राहिले होते !

मी हंसत हंसत म्हटलं, ' यंदाच्या मार्गशीर्षात आतां दोन लग्नं एकदमच होणार ! एक रजिष्टर पद्धतीचं अन् दुसरं वैदिक पद्ध-तीचं ! '

पण रावसाहेब काय कमी होते ! ते लगेच म्हणाले,

' दोन का ? तीन होणार आहेत. अन् हें तिसरं गांधी पद्धतीनं व्हायचं ठरलंय ! '

त्यावर सगळीजणं हंसूं लागलीं.

मी रावसाहेबांच्याकडे रागानें पाहिलें. तेव्हां ते पुन्हां म्हणाले

' बरं बुवा, गांधीपद्धतीनं राहिलं. अगदीं बालेखानचा बँड लावून करूं. मग तर झालं ? '

---

कितीहि विचार केला तरी मनाची टोचणी कांहीं थांबत नाहीं. ुंबईला मी मजुरांचा संप लढविला अन् तो यशस्वी केला तेव्हां उन्मादानें नाचत सुटलों नुसता! पण तो उन्माद तर बाजूलाच ाहिला, नुसतं साधं समाधान देखील माझ्या मनाला भातां वाटेना! या उपाशी मरणाऱ्या लोकांसाठीं मी बापूंशीं लढा केला. तो लढा यशस्वी होऊन संपला. पण त्यांत बापूंचा बळी ाडून तो संपायला नको होता, असं पुनः पुन्हां मला वाटतं!

या शेतकऱ्यांना आतां भरपूर खायला मिळेल, घरच्याप्रमाणें तमिनी पिकवितां येतील अन् राहाण्यासाठीं घरंहि बांधतां येतील, ; खरं! मला हेंच पाहिजे होतं. पण— पण हें अशाप्रकारें मेळायला नको होतं!

बापूंचा विरोध सतत सहन करीत अन् त्या विरोधाला तोंड ्त देत हें मिळायला हवं होतं!

या लोकांना बापू म्हणजे राक्षसासारखे वाटत होते. त्यांच्या मृत्यूनें कित्येकांना आनंदहि झाला असेल! पण रावजीबाबासारखे कितीतरी लोक त्यांच्यासाठीं धाय मोकलून रडत होते. रावजीबाबा तर अजून म्हणतो, ' कसाहि असला तरी आमचा राजा होता तो!'

अन् त्यानें तसें म्हटलें, कीं नकळत माझे डोळे पाण्यानें भरतात आणि माझ्या तरळत्या दृष्टीपुढें बापूंचा तो रुबाबदार, करारी चेहरा दिसूं लागतो!

पण खरंच, मला दरडावणारा का असेना पण बापूंचा चेहरा, आतां जन्मांत तरी मला बघायला मिळेल का?

हा विचार मनांत आला कीं मला हुंदका आवरत नाहीं! कुठं-तरी जाऊन खूप खूप रडावं असं वाटतं!

  

या आठवड्यांत गांवांतील प्लेग अजिबात नाहींसा झाला. अन् दुष्काळ हटविण्यासाठीं गेल्या चार दिवसांत पावसानं अगदीं झोड उठविली. सगळ्या जमिनींत हातहातभर ओली झाल्या!

उद्यां घात आली कीं पेरायला सुरवात होणार!

डॉक्टरनीं मला घरीं जायची परवानगी दिली होती. त्याप्रमाणें मी आज घरीं जाणार होतों.

सकाळींच आईकडून एक ताज्या वृत्तपत्राचें कात्रण आलें. त्यांत सुरेंद्राची बातमी होती. अहमदाबादच्या दारू पिकेटिंगमध्यें त्यानें भाग घेतला होता, आणि तिथं झालेल्या दंगलींत तो जखमी झाल्यामुळें त्याला तिथल्या हॉस्पिटलमध्यें ठेवलें होते. ती बातमी

वाचून मला आनंद झाला. त्याला आणण्यासाठीं उद्यांच जायचें मी ठरविलें.

नऊच्या सुमारास सगळ्या शेतकऱ्यांची सभा भरली. डॉक्टरनीं त्यांना सांगायचं तें सगळं सांगून टाकलं. मी बोलण्याची कांहीं जरुरी नव्हती. पण डॉक्टरनीं मला उठविलं.

मी बोलूं लागलों,

' आज तुमच्यापुढं बोलतांना मला एकप्रकारचा आनंद होतोय अन् एकप्रकारचं दुःखहि होतंय ! मला जें साध्य करायचं होतं तें साध्य झालं म्हणून आनंद होतोय तर तें साध्य करतांना माझ्या बापूंवर......'

मला पुढचे शब्द उच्चारतां आले नाहींत. ते सोडून मी म्हटलं, ' आतां घात आली, कीं तुमच्याकडे असलेल्या जमिनी तुम्ही पेरून टाका. त्या जमिनी तुमच्याकडेच राहतील ! अन् ज्यांना जमिनी नसतील त्यांनीं तसं सांगावं. त्यांना फक्त सरकारी साऱ्याच्या अटीवर जमिनी दिल्या जातील ! '

माझं बोलणं ऐकून सगळ्यांचे चेहरे फुलून गेले. त्यांच्या चेहऱ्यावरचा तो हसरा आनंद मी आज जन्मांत पहिल्यानें पाहात होतों.

त्याचवेळीं माझी नजर सुभद्रेकडे गेली. तिचे डोळे पाण्यानें भरले होते. मी म्हटलं, ' सुभद्रा, हें काय ? '

तिच्या तोंडून एकच शब्द निघाला, ' इंद्रीर ! '

' एक महिन्यांतच तो येईल ! '

मी खुर्चीवरून उठून पद्मासह घरीं जायला निघालों. फाटकां-

तून बाहेर पडलों, तों समोर माई उभी होती. मला आश्चर्याचा धक्काच बसला ! मी एकदम उद्गारलों, ' माई ? '

' भगवान, मी एक मागणं मागायला आलेंय ! '

' काय हवंय माईला ? '

' मरण ! गेल्या पंधरावीस दिवसांत मी जगाचे जे अनुभव घेतले, त्याने भांबावून गेलें आहें. जिकडे तिकडे राक्षस नि पशूच-भरलेल्या त्या जगांत तडफडण्यापेक्षां तुझ्या हातून मरण आलं तरी तें पत्करावं म्हणून मी परत आलें ! '

' वेड्या आहांत माई तुम्ही. मी अन् सुरेंद्र अशीं दोन मुलं तुम्हांला असतांना, तुम्हांला कोण मरूं देईल ! '

माईंचा हात धरून मी घराकडे निघालों.

लांबूनच मला दरवाजा दिसला. महिन्यापूर्वी या दरवाजांतून बापूंनीं मला बाहेर ढकललं होतं. आणि आज ? बापूंना घराबाहेर ढकलून मी त्या दरवाजांत शिरणार होतों !

माझं हृदय आंतल्याआंत गुदमरूं लागलं !

घराजवळ आलों. आई दरवाजांत वाट पाहातच उभी होती. पण तिचं तें पांढरं फटफटीत कपाळ बघून मला भडभडून आलं !

मला मिठी मारून तिनं ' भगवान ! ' म्हणून हंबरडा फोडला ! मला हुंदका आवरला नाहीं. माझा शोकावेग अनावर झाला. एखाद्या लहान मुलाप्रमाणें तिच्या गळां पडून मी रडूं लागलों !

---